{१}

# श्रीमद्भगवद्गीता

श्रीकृष्णानें युद्धारंभीच अर्जुनास गीता सांगितली ही परंपरागत कथा क्षणभर बाजूस ठेवून महाभारत हें एक आर्ष महाकाव्य आहें अशा बुद्धीनें जरी विचार केला तरी गीता महाभारतांत सांगण्यास जी स्थल-योजना केली आहे, तीच गीतेचें महत्व लोकांच्या लक्षांत येण्यास काव्यदृष्ट्याहि योग्य आहे असें यावरून दिसून येतें.

गीता महाभारताच्या मध्यभागीं सर्व भारतावर प्रकाश देत उंच दीपाप्रमाणें उभी आहे. एकीकडे सहा पर्वें आणि दुसरीकडे बारा पर्वें अशा मध्यभागीं तसेच एकीकडे सात अक्षौहिणी सैन्य आणि दुसरीकडे अकरा अक्षौहिणी सैन्य अशाहि मध्यभागीं गीता उपदेशिली गेली आहे.

स्वत: अलिप्त राहून व्यासांनी या विराट संसाराचें छाया-प्रकाशमय चित्र रेखाटलें आहें.

व्यासांनी एवढे महाभारत लिहिलें पण व्यासांना स्वत:चें असें कांहीं सांगायचें होतें कां? त्यांचा विशिष्ठ संदेश त्यांनी कोठें सांगितला आहे? कोणत्या ठिकाणीं व्यासांची समाधी लागली आहे? महाभारतांत ठिकठिकाणीं तत्त्वज्ञानांचे आणि उपदेशांचे विस्तृत प्रांत दिसत आहेत पण या सर्व तत्त्वज्ञानांचें, उपदेशांचें आणि **एकंदर महाभारत ग्रंथाचें सारभूत रहस्य त्यांनी कोठें मांडलें आहें कां?**

याचें उत्तर असें कीं, समग्र महाभारताचें नवनीत व्यासांनी **श्रीमद्भगवद्गीतेंत** आणलें आहें. गीता ही व्यासांची मुख्य शिकवण आहे. त्यांच्या चिंतन-मननाची ती पूर्ण साठवण आहे. हिच्याच आधारानें 'मुनिनामप्यऽहं व्यास:' ही विभूति सार्थ ठरली आहे. गीता अध्याय १० श्लोक ३७.

गीता हें उपनिषदांचेंहि उपनिषद् आहें. पार्थाच्या निमित्तानें **वेदत्रयांचें** दोहन करून हें गीता-दुग्ध श्रीकृष्णानें जगाच्या हातीं दिलें आहें. जीवनाच्या विकासाला आवश्यक असणारा प्राय: प्रत्येक विचार गीतेंत आलेला आहे. यामुळेंच **गीता**

हा धर्म-ज्ञानाचा कोश आहे असे अनुभवी पुरूष म्हणत असतात गीता हा लहानसाच पण हिंदु-धर्माचा मुख्य ग्रंथ आहे.

**Shrimat Bhagvat Gita is the deepest and sublimest production that the world possesses. It is pre-emeniently a scrip-ture of future world religion. A gift of India's glorious past to the moulding of still more glorious future of mankind.**

ग्रेटब्रिटनमधील एका व्यक्तीचे हे उद्गार आहेत. याचा अर्थ असा कीं,

श्रीमद्भगवद्गीता हें जगाला लाभलेलें गहन आणि उच्चतम शास्त्र आहें. अगदी नजिकच्या काळांत तें जगाचा धर्मग्रंथ म्हणूनहि असल्याचे प्रत्ययास येईल. हिंदुस्थानच्या सार्वभौम भूतकालाची अशी देणगी आहे कीं,जी मानव जातीचा भविष्यत् कालदेखिल अधिकाधिक उज्वल करील.

हें सर्व ध्यानीं घेतल्यावर "गीतेंतील ज्ञान रणभूमीवर सांगण्याचें कारण नाहीं. गीता मागाहून कोणीतरी महाभारतांत घुसडली आहे; अर्थात् ती प्रक्षिप्त आहे," असें विक्षिप्तपणाचे अकलेचे तारे तोडणाऱ्याकडे 'तुष्यन्तु दुर्जनः' या न्यायानें लेशमात्रहि लक्ष द्यायचें कारण उरत नाहीं.

गीता ग्रन्थांत ७०० श्लोक आहेत हें आचार्यांनीं आपल्या गीताभाष्यांत आरंभीच स्पष्ट केलें आहें. "भगवता यथा उपदिष्टं तं धर्मं सर्वज्ञः भगवान् वेदव्यासः गीताख्यैः सप्तभिः श्लोकशतैः उपनिबबन्ध।।" हल्ली उपलब्ध असलेल्या प्रतींतून तितकेच श्लोक आढळून येतात. या ७०० श्लोकांतील १ श्लोक धृतराष्ट्राचा, ४० संजयाचे, ८४ अर्जुनाचे आणि ५७५ श्रीकृष्णाचे आहेत.

महाभारत हा ग्रंथ विस्तीर्ण असल्यामुळें त्यांत मधून-मधून दुसरें श्लोक घालणें, असलेले कांहीं काढणें, निरनिराळ्या कालखण्डांत संस्करणामुळें शक्य आहे. परन्तु गीतेची गोष्ट तशी नाही. गीता हा ग्रंथ नेहमीच्या पाठांतला असून

## वेदाप्रमाणें संपूर्ण गीता तोंडपाठ म्हणणारे लोक पूर्वीच्या काळीं पुष्कळ होते आणि अद्यापहि कांहीं आहेत.

हल्लीच्या गीतेंत पाठभेद फारसे आढळून येत नाहीत आणि जे थोडे भिन्न पाठ आहेत ते टीकाकारास माहीत आहेत याचें कारणहि हेंच आहें. हें एक उदाहरण पहा, ' सौमदत्तिस्तथैवच ' अध्याय १ याऐवजी 'सौमदत्ति जयद्रथ' असाहि एक पाठ आहे. याशिवाय गीताग्रन्थांत कोणी फेरबदल करूं नये या हेतूनेच त्यांत बरोबर ७०० श्लोक घातले असावेत असेहि म्हणण्यास हरकत नाही. महाभारतांत गीता प्रक्षिप्त आहे या आक्षेपाच्या निरसनासाठीं असें पहा कीं, भगवद्‌गीता हा महाभारताचाच एक भाग आहे याचे प्रत्यक्ष महाभारतांतच बरेच ठिकाणीं उल्लेख आहेत. यांतील पहिला उल्लेख अदिपर्वाच्या प्रारंभी जी अनुक्रमणिका दिली आहे, तींत येतो. '' पूर्वोक्तं भगवद्‌गीतापर्व भीष्मवधस्ततः '' असें प्रथमतः पर्व-वर्णनांत सांगितले आहें, हा एक उल्लेख आहे. भीष्म पर्वाच्या वर्णनांत ''कष्मलं यत्र पार्थस्य वासुदेवो

महामतिः। मोहजं नाशयामास हेतुभिर्मोक्षदर्शिभिः।। असा गीतेचा स्पष्ट उल्लेख आहे. हा दुसरा उल्लेख. ‘‘अर्जुनाला मोह झाल्यावर कृष्णानें विश्वरूप दाखविलेलें ऐकलें तेव्हां जयाविषयीं माझी निराशा झाली.’’ असें धृतराष्ट्र म्हणतो. हा तिसरा उल्लेख आहे. गीतेसंबंधी आदिपर्वांतील हे तीन उल्लेख आहेत. याशिवाय अश्वमेध पर्वांतील अनुगीतेंमधील निर्देशासह महाभारतांत भगवद्गीतेचा सातवेळां स्पष्ट उल्लेख आला आहे.

अर्थात् भगवद्गीता हा हल्लीच्या महाभारताचाच एक भाग आहे. असें त्यांतील अंतर्गत पुराव्यावरून स्पष्ट सिद्ध होतें. गीतेंत आणि महाभारतांत २७ सबंध श्लोक, १२ श्लोकार्धे निरनिराळ्या प्रकरणांतून कधी अक्षरशः तर कधी थोड्या पाठभेदानें एकसारखीच आहेत. यापैकीं प्रायः प्रत्येक ठिकाणीं हे श्लोक पूर्वापर संदर्भाला धरून योग्य ठिकाणीं आलेले आहेत, प्रक्षिप्त नव्हेंत असें ध्यानीं येतें.

अशा दृष्टीने विचार केला म्हणजे महाभारताच्या इतर प्रकरणांत हे श्लोक गीतेंतून घेतले असतील असे म्हणतां येत नाहीं. याउलट इतक्या निरनिराळ्या प्रकरणांतून हे श्लोक गीतेंत घेतले

असणेहि संभवनीय नाही. तेव्हां गीता आणि हीं प्रकरणें लिहिणारा पुरूष एकच असला पाहिजे असें अनुमान करणें भाग पडतें.

मार्गशीर्ष महिन्यासंबंधीचें सादृश्य तर विलक्षणच आहें. गीतेंत ''मासानां मार्गशीर्षोऽहं'' अध्याय १० श्लोक ५. असें या महिन्यास ज्याप्रमाणें प्रथम स्थान दिलें आहें, त्याप्रमाणेंच अनुशासन पर्वांत दान-धर्म प्रकरणीं उपवासाकरितां महिन्यांचीं नांवें दोनदां सांगण्याचा जेथें प्रसंग आला तेथें प्रत्येक वेळीं मार्गशीर्ष महिन्यापासूनच महिने मोजण्यास सुरवात केली आहे. अनुशासन पर्व १०६ आणि १०९.

भारत आणि महाभारत हे शब्द हल्ली आपण समानार्थी वापरतो. पण हे दोन शब्द अथवा या दोन संज्ञा निराळ्या आहेत. सरळ शब्दार्थ पाहिला तर 'महाभारत' म्हणजे मोठे भारत असा अर्थ होतो. हा अर्थ घेतला तर मोठे भारत होण्यापूर्वी एकादे लहान भारत किंवा नुसते 'भारत' म्हणून होतें काय?

आणि त्यांत गीता होती कीं नाही अशी सहज शंका येते. हल्लीच्या महाभारताच्या आदिपर्वांत महाभारत ग्रंथ २४,००० श्लोकांचा असून याचें अगदी पूर्वी 'जय' नांव होतें असें म्हटले आहें. आदिपर्व ६२,२०. आश्वलायन गृह्यसूत्रांत ''सुमन्तु, जैमिनी, वैशंपायन.... भारत.........महाभारत..........धर्माचार्या:। आश्वलायन गृह्यसूत्र ३.४,४ असा ऋषितर्पणांत भारत आणि महाभारत या दोन निरनिराळ्या ग्रन्थांचा जो स्पष्ट उल्लेख आहे, त्यावरून हेंच अनुमान दृढ होतें कीं, लहान भारताचा याप्रमाणें मोठ्या भारतांत समावेश झाल्यानंतर लहान भारत हा ग्रंथ शिल्लक राहिला नाही, आणि यामुळेंच आजघडीला महाभारत हाच काय तो भारत ग्रंथ अशी सर्वसामान्य लोकांची समजूत होणे स्वाभाविक आहे. यामुळेंच मूळच्या भारतांतहि गीता नसेल असें म्हणणें संभवत नाहीं. मूळ गीतेला हल्ली जें प्रामाण्य आहें तें तिला हल्लीच्या महाभारतानंतर आलें आहें असें दिसत नाहीं. भारताचें महाभारत होतांना मूळच्या गीतेंत जर पुष्कळ फरक झाला असतां तर या प्रामाण्याला

धोका आल्याखेरिज राहिला नसतां पण तसें न होता हें प्रामाण्य अबाधित राहिलें आहें; इतकेच नव्हें तर तें अधिकच वाढलें आहें. म्हणून मूळच्या गीतेंत जो फरक झाला तो मूलोत्पाटी नसून मुळांतील अर्थाचा ज्याने परिपोष होईल अशा स्वरूपाचाच असला पाहिजे असें अनुमान करणें भाग पडतें.

गीतेला याप्रमाणें एकदां जें स्वरूप प्राप्त झालें तें आजमितीपर्यंत कायम आहें. अतिप्राचीन पुराणापूर्वी कांहीं शतकें तरी हल्लीची गीता अस्तित्त्वांत होती आणि ती प्रमाणभूत होती. ती पूर्ण प्रमाणभूत नसून फिरविता येण्यासारखी झालेली असती तर तिच्या नमुन्यावर तशाच गीता करण्याचें पुराणकारांच्या मनांत येणेच संभवनीय नव्हतें. उदाहरणार्थ—शिवगीता, गणेशगीता, गुरूगीता, रामगीता इत्यादि. तसेच गीतेच्या निरनिराळ्या सांप्रदायिक टीकाकारांनीं एकाच गीतेंतील शब्दांची ओढाताण करून गीतार्थ आपल्याला अनुकूल आहे असें दाखविण्याची जी खटपट केली आहे, तीहि करण्याचें तसें कांहींच कारण दिसत नाहीं.

इसवीसन पूर्व १५०० वर्षें मूळ भारत आणि तदंतर्गत गीता प्रथम झालेली आहेत. आणि भारताचें महाभारत होतांना या मूळ गीतेंत तदर्थपोषक कांहीं सुधारणा झाल्या--असल्या तरी गीतेचें एकंदर स्वरूप तेव्हांहि बदललें गेले नाहीं. आणि आजमितीपर्यंत तींत पुन्हां दुसरा कांहीं फेरफार झालेला नाही आणि होणे शक्यहि नाही.

दुसरें असें कीं, हल्लीच्या गीतेंतील कांहीं सिद्धान्त परस्पर विरोधी भासतात. यामुळें हल्लीच्या महाभारतांतील गीतेंतहि वेळोवेळीं फरक झाला असेल अशी शंका कित्येक काढीत असतात. पण हे विरोध वास्तविक नसून धर्म-प्रतिपादन करणाऱ्या पूर्वापर वैदिक पद्धतीचें स्वरूप नीट न समजल्यामुळें निर्माण होणारा हा भ्रम आहे.

# {२}

संपूर्ण वेदवाङ्मयानंतर **श्रीमद्भगवद्गीता** हाच कृष्ण-भक्तीचा प्रथम ग्रंथ ठरतो. इतर सर्व वाङ्मय नंतरचे आहें. **प्राचीन गीता हाच आत्म-लाभ करून देणारा प्रथमचा स्मृतिग्रंथ आहे.** वेदान्ती वर्गाने गीतेला आपल्या चौकटींत ओढले. वास्तविक गीतेचा आणि त्यांचा कांहींहि संबंध नाहीं.

वेदवाङ्मयाचे प्रथम, मध्य आणि अंतीम असें सर्वच भाग गीतेंत समाविष्ट झाले आहेत. **संपूर्ण वेदार्थ सामान्य जनासाठीं संग्रहित केला गेला ती गीता होय.** केवळ 'सर्वोपनिषदोगावो' हें चूक आहे 'वेदोपनिषदोगावो' असेच म्हणावयास हवे आहे

वैदिक कालखण्डांतील संन्यास केवळ उपनिषदांतून निघाला नाही तसा योगहि कर्मकाण्डांतून निघाला नाही. **कर्म, भक्ति, ज्ञान आणि**

ध्यान यांनी वैदिक जीवन परिपूर्ण होतें.

वैदिक कालखण्डांत कर्म, भक्ति, ज्ञान, ध्यान यांची मौखिक आणि वैचारिक परंपरा होती. त्यांची बौद्धिक अतिशास्त्रीय परिभाषा नव्हती.

गीतेने ब्रह्मसूत्राप्रमाणें वेदवाङ्मयाचा समन्वय केला नाही; तर सामान्य जनासाठीं एक परिपूर्ण वेदसंमत साधनमार्ग दाखविला. वेदांतील संपूर्ण जीवन-दर्शन म्हणजे श्रीमद्भगवद्गीता. गीता हाच वेद वाङ्मयाचा संदेश आहे.

महाभारताविषयीं ज्ञानदेवांचें कथन अतिशय अर्थपूर्ण आहे. वेद तीन वर्णांच्या कानीं लागला असें ज्ञानदेव म्हणतात. यानुसार समाजाच्या तळांतील वर्गाविषयीं आस्था हें गीतेचें वैशिष्ठ्य ठरतें.

भाषा आणि छन्दोरचना आर्ष असल्यामुळें गीता नि:संशय प्राचीन आहे. काव्यमय स्वरूपानें रसमय झालेल्या तिच्या आर्ष रचनेची हीं उदाहरणें पहा—

‘अन्त’ अध्याय २ श्लोक १६. ‘भाषा’ २:५४. ‘ब्रह्म’ (प्रकृति) १४:३. पादपूरक अव्यय ‘ह’ २:९.

वगैरे शब्द गीतेंत ज्या अर्थाने आले आहेत त्या अर्थाने ते कालिदासादिकांच्या काव्यांत दिसून येत नाहीत. पाठभेदाने कां होईना पण ११:३५, यांत 'नमस्कृत्वा' असा अपाणिनीय शब्द आणि ११:४८, यांत 'शक्यअहं' असा अपाणिनीय संधीहि आहे तसेच 'सेनानीनामहंस्कंद:' १०:२४ यांतील 'सेनानीनां' ही षष्ठीहि पाणिनीप्रमाणे शुद्ध नाही. ही सर्व आर्ष रचनेचीं उदाहरणें आहेत. ११ व्या अध्यायांतील विश्वरूप वर्णनाचे जे श्लोक आहेत, अध्याय ११ श्लोक १५ ते ५० यावरूनहि हीच गोष्ट निदर्शनास येते. हे ३६ श्लोक आहेत. यांतील प्रत्येक चरणांत अकरा अक्षरें आहेत. यांत गणाचा नियम नसून एक चरण इंद्रवज्रा तर दुसरें उपेंद्रवज्रा तिसरें शालिनी तर चौथे आणखी निराळ्याच प्रकारचें. याप्रमाणे अकरा निरनिराळ्या जातीचे चरण या ३६ श्लोकांत म्हणजे १४४ चरणांत आढळून येतात. तथापी दर चरणांत अक्षरें अकरा असून पहिलें, चवथे, आठवे आणि शेवटची दोन गुरू आणि सहावे प्राय: लघु असा नियम त्यांत दिसून येतो. यावरून ऋग्वेदांतील त्रिष्टुप वृत्ताच्या चालीवर हे श्लोक रचलेले आहेत असें अनुमान निघतें. कालिदासाच्या काव्यांत असली अकरा अक्षरांची विषम वृत्तें आढळून येत नाहींत. शाकुन्तल नाटकांत 'अमीवेदिं परित:क्लृप्तधिष्ण्या:'। हा श्लोक या छन्दाचा आहे;

पण कालिदासानेच यास ऋक्छन्द असें नांव दिलें आहें. यावरून गीता ग्रंथ आर्षवृत्तें प्रचारांत असतांना निर्माण झालेला आहे हें उघड होतें.

# {३}

गीता संपूर्ण वेदवाङ्मयाला अनुसरली आहे. संहिता, ब्राह्मणें, आरण्यकें, उपनिषदें या सर्वांना गीता अनुसरली आहे. श्रुतेरिवार्थंस्मृतिरन्वगच्छत्। गीता हा स्मृतिग्रंथ आहे. तिच्यांत समग्र वेददर्शन आहें; यामुळें निव्वळ उपनिषदांनी गीतेचा अर्थ मर्यादित करणें केव्हांहि उचित होणार नाहीं. प्रस्थानत्रयांत गीता समाविष्ट करणें फार चुकीचें काम आहें. लोकमान्य टिळकांना जें कांहीं म्हणायचें होतें, त्यांतील शास्त्रीयता लोप पावल्यामुळें आणि त्यांचें प्रतिपादन योग्य असूनहि प्रत्यक्षांत तो विषय त्यांच्या मनांत धूसर झाल्यामुळें सगळाच ब्रह्मघोटाळा झाला आहे. लोकमान्य प्रस्थानत्रयांत गीतेचा समावेश कां झाला त्याचीं कारणें सांगतात, म्हणजे प्रस्थानत्रयांत गीतेचा समावेश मान्य करून त्यांनी सुरवातीसच तळ गाठला. इथेच त्यांनी गीतेला स्वतःहून मर्यादा घातली. आणि यामुळेंच ते गीतेची खरी बूज राखूं शकले नाहीत. अर्थात् त्यांचा

नुसताच आग्रह शिल्लक राहिला. शास्त्रीय वाङ्मयांत हें असें चालत नाहीं.

भारतीय युद्ध झाल्यानंतर २/३ वर्षांत ‘जय’ ग्रंथ तयार झाला. महाभारताच्या आदिपर्वांतील नमनाचा श्लोक पहा—

नारायणं नमस्कृत्य नरंचैव नरोत्तमम्।
देवीं सरस्वतीं व्यासं ततो जयं उदीरयेत् ।।

पाण्डवांच्या जयाचें वर्णन म्हणून तो ‘जय’ ग्रंथ. हा इतिहास ग्रंथ आहे. पुराण ग्रंथ नाहीं. या ‘जय’ ग्रन्थांत गीता समाविष्ट होती. यानंतर ५०० वर्षांनी सूत्रवाङ्मयास प्रारंभ झाला. बादरायणाचार्यांची ब्रह्मसूत्रें, जैमिनींची धर्मसूत्रें, पतंजलींची योगसूत्रें इत्यादि. याच कालखण्डांत ‘जय’ ग्रंथाचें संस्करण होऊन **भारत** तयार झालें आणि त्यांतील गीतेचेंहि संस्करण होऊन **भारतान्तर्गत मूळ गीता तयार झाली.**

‘जय’ ग्रंथ कृष्णद्वैपायन व्यासांनी लिहिला; मात्र त्यावर संस्करण होऊन जो **भारत ग्रंथ** तयार झाला

तो ब्रह्मसूत्रकार बादरायण व्यासांनी केला असा सर्वमान्य समज आहे. शंकराचार्य, व्यास आणि बादरायण व्यास यांचा भिन्नत्वानें निर्देश करतात. त्यांनी कोठेंहि दोघांचा एकत्वानें निर्देश केला नाही. उदाहरणार्थ ''तथाहि अपान्तरतमानाम वेदाचार्यः पुराणर्षिः विष्णुनियोगात् कलिद्वापारयोः संधौ कृष्णद्वैपायनः संबभूवेति स्मरन्ति ''।। अथवा '' स्मरन्ति च व्यासादयोः यथा जैवेन दुःखेन परमात्मा न दुःखायते इति''। येथे व्यासांचा स्मृतिकार, महाभारतकार म्हणून आचार्यांनी उल्लेख केला आहे. सूत्राविषयीं अथवा सूत्रकार म्हणून उल्लेख करतांना आचार्य बादरायण असे लिहिण्यास विसरले नाहीत. उदाहरणार्थ ''बादरायणस्तु आचार्यो भावमधिकारस्य देवादीनां अपि मन्यते । किंवा भगवान् बादरायणः आचार्यः पठति''। याशिवाय **अध्याय १३ श्लोक ४ यावरील भाष्यांत आचार्यांनी ब्रह्मसूत्रें घेतलीं नाहींत** तर उपनिषदांतील ब्रह्म-प्रतिपादक-वाक्यें असा अर्थ केला आहे.

**यावरून 'जय' ग्रन्थांतील गीतेंत 'जया' नंतर ५०० वर्षांनी आरंभ झालेल्या सूत्रवाङ्मयाचा उल्लेख कसा येईल?**

हेच आचार्यांनी सूचित केले आहे. किंबहुना त्यांच्या वेळेपर्यन्त चालत आलेला इतिहासच त्यांनी आपल्या भाष्यांत गोवला आहे. हा सर्व विस्तार मी अशासाठीं केला कीं, आचार्यांच्या मताप्रमाणें गीता जरी ब्रह्मसूत्रांना अनुसरत नसली तरी केवळ उपनिषदांना अनुसरतें म्हणून ती सूत्रवाङ्मयांत, प्रस्थानत्रय या स्वरूपांत समाविष्ट करणें अपरिहार्य आहे. यामुळें माझ्या मतें हा उलट बाजूने डाव टाकून गीतेचें वैशिष्ठ्यच नष्ट करणारी आणि ब्रह्मसूत्रामागे तिला फरफटत नेणारी अनुचित योजना निर्माण झाली आहे. गीतेला प्रस्थानत्रयांत समाविष्ट करण्याचा हा हट्टाग्रह कशासाठीं ते समजत नाही. ब्रह्मसूत्रें हा परमहंस संन्यास मार्गाचा, बादरायणाचार्यांनी संन्यास मार्गीय उपनिषदांच्या आधारें तयार केलेला एकमेव सर्वोत्कृष्ट ग्रंथ आहे.

प्रस्थानत्रय असा शिक्कामोर्तब करून गीतेला संन्यासमार्गीयांच्या पंक्तीला नेऊन बसविण्याची वेदान्त्यांची ही बुद्धिपुरःसर योजना

आहे. यासाठीं त्यांनी गीतेच्या टाळूवरून हात फिरवून तिचें मुंडन केलें आहें. त्यांची ही मुक्ताफळें पहा—

“तस्यास्य गीता शास्त्रस्य संक्षेपतः परम प्रयोजनं निःश्रेयसं सहेतुकस्य संसारस्य अत्यन्तोपरम लक्षणं। तत् च सर्वकर्मसंन्यासपूर्वकात् आत्मज्ञान निष्ठारूपात् धर्मात् भवति।”

प्रवृत्तिपुनरावृत्तिः। “अकामस्य क्रिया काचित् नेह नानास्ति कर्हिचित्। यद्यत् हि कुरूते कर्म तत् तत् कामस्य चेष्टितम्।।” ज्ञानं संन्यासलक्षणं इति।

‘निष्क्रिय ब्रह्मांत अवस्थित असणारा सक्रिय कसा असूं शकेल?’ इत्यादि.

ब्रह्मसूत्राला भिक्षुसूत्रें असेहि एक नांव आहें. यावरून ही सूत्रें संन्यासमार्गाची आहेत हें उघड होतें.

गीता केवळ उपनिषदांना अनुसरतें, ही गोष्ट टिळकांनी स्वीकारली आणि प्रस्थानत्रयांत गीता समाविष्ट करण्याला मान्यता दिली. यामुळें प्रतिपक्षाला रान मोकळे करून देऊन त्यांनी स्वमत निराधार करून टाकलें.

गीतेचा आणि सूत्रवाङ्मयाचा काडीइतकाहि संबंध नाही. गीतेंत सांख्य याचा अर्थ ज्ञानमार्ग असा आहे. त्याचा अर्थ सांख्यशास्त्र असा नाही. कपिलांची सांख्यसूत्रें सर्वज्ञात आहेत. सांख्यांचें प्रधानमल्ल म्हणून खंडन करतांना आचार्यांनी ईश्वर-कृष्णाच्या सांख्यकारिका उधृत केल्या आहेत कारण सूत्रापेक्षां त्या अर्थघन आहेत. म्हणूनच त्यावर जयमंगला, विद्वत्तोषिणी, माठरवृत्ति अशा तेजाळ टीका निर्माण झाल्या आहेत. 'ज्ञानयोगेन सांख्यानां' गीता अ०३ अथवा 'यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं' गीता अध्याय०५. यांतील सांख्य म्हणजे सांख्यशास्त्र नाही—जे निरीश्वरवादी असून प्रतिशरिरांत भिन्न, याप्रमाणें अनंत आत्मे मानणारे आहे. जर अशी वस्तुस्थिती आहे तर गीतेनें तिच्यांतील ज्ञानमार्गाला सांख्य कां म्हटले? हा प्रश्नच उलटा विचारला गेला आहे. सरळ प्रश्न असा होईल कीं,संपूर्ण वेगळा कालखंड असणाऱ्या प्राचीन गीतेंतील ज्ञानमार्गासाठीं उपयोजिलेली सांख्य ही संज्ञा, कपिलांनी सूत्रकालांत

आपल्या रचना केलेल्या सूत्रांना कां दिली? ब्रह्मसूत्रांत सांख्यांचें खंडन केलें आहें. मात्र गीतेंतील सांख्याविषयीं तसें दिसत नाही. उलट ब्रह्मसूत्रांत अनेक ठिकाणीं गीतेचा स्मृति म्हणून आधार घेतला आहे.

गीतेच्या १० व्या अध्यायांत एक उल्लेख आहे, "सिद्धानां कपिलोमुनि:।" येथला कपिल कोण? सांख्यसूत्रें रचयिता कपिल कोण? दुसरें असें कीं, ब्रह्मसूत्रें अथवा पाणिनीने संज्ञा दिलेली भिक्षुसूत्रें तयार झाल्यावर म्हणजे संन्यासमार्गी उपनिषदांचा अन्वयार्थ लागल्यावर ज्ञानमार्ग {वेदान्त} तयार झाला. असे असेल तर असा उपनिषदांचा समन्वय न होता गीतेच्यावेळीं सांख्य हा ज्ञानमार्ग कसाकाय होता? त्याला उपनिषद् वाक्यांच्या समन्वयाची गरज कां राहिली नाही? आणि अशी गरज न राहतां त्यांत पूर्णता कशी आली?

येवढे परिपूर्ण गीताशास्त्र असतांना सूत्रकारांना उपनिषदांच्या समन्वयाची गरज कां निर्माण झाली? सूत्रवाङ्मयाच्या रचनेमागचा खरा आणि नेमका उद्देश काय? या आणि अशा प्रश्नमालिकांची उत्तरे न मिळताच गीतेचा प्रस्थानत्रयांत समावेश करण्याची ही घिसाडघायी कशासाठीं?

श्रीमद्भागवत हें इसवी सनाच्या दुसऱ्या शतकांतील आहे. यामुळेंच लोकमान्य म्हणतात, भागवत ही नंतर बनविलेली पुरण-पोळी आहे. त्यांचा ध्वन्यर्थ ध्यानीं घेऊनहि त्यांनी भागवताविषयीं सुयोग्य शब्दांत अभिप्राय व्यक्त केला आहे असे मला वाटतें. भागवत अति महत्वाच्या मुद्यावर गीतेला अनुसरलें आहे. भागवताच्या एकादश स्कन्दावर टीका करतांना नाथ म्हणतात, ''सांख्यविवेक गभस्ती। पूर्ण उगवला ज्याचें चित्तीं। तेथ विकल्पाची अंधारी राती। कैशारीतीं उरेल।। जें साराचेंहि निजसार। जें गुह्य ज्ञान-भांडार। जें का विवेक-रत्नाकर। तें सांख्य साचार उद्धवा।।

भागवताविषयीं माझा अभिप्राय असा आहे कीं, भागवतानें गीतेला मधाचें चाटण दिलें आहें. गीतेंतील भक्ति ज्ञानाहून भिन्न नाही. ज्ञान जिरलें–मुरलें म्हणजे तें गोड होतें—अगदी मोरावळ्यासारखे—असें हें मधुर

झालेलें ज्ञान म्हणजे भक्ति. भागवतांतील भक्ति भावभक्ति आहे. सुरवातीपासूनच तिच्यांत एक झपाटलेपण आहें. त्यामुळें ती अतिलोभस आहे. अंतरंग भारून टाकणारी आहे.

एवं प्रियायैः व्रतनामकीर्त्या। जातानुरागोद्रुतचित्तउच्यैः ।
हसत्यथोरोदितिरौतिगायन्। उन्मादयन्नृत्यतिलोकबाह्यः ।।

विषयान्तर बरेच झालें. भागवताचा विषय मी अशासाठीं घेतला कीं, सांख्य या शब्दाचा अर्थ गीतेप्रमाणें भागवतानेंहि केला आहे. आपला पूर्वीचा मुख्य प्रश्न असा कीं, “ सिद्धांमध्यें कपिलमुनि मी आहे” असें गीता म्हणतें. अध्याय १०. हे कपिल कोण? सांख्यसूत्रें रचयिता कपिल असते तर निरीश्वरवादी आणि अनंत आत्मे मानणाऱ्या कपिलांचा स्वतःची विभूति म्हणून कृष्ण उल्लेख करणे कसें शक्य आहे? तेव्हां ज्यांना विभूति म्हटले ते कपिल कोण? यावरील शांकरभाष्य पहा,“ सिद्धानां– जन्मनाएव धर्म-ज्ञान-वैराग्य-ऐश्वर्यातिशयं प्राप्तानां कपिलः मुनिः”

यामध्यें सूत्रकार कपिलांचें नांवनिशाण नाहीं. मात्र याबाबत टिळकांनी हिमालयाएवढी चूक केली आहे.

या समस्येचें खरे समाधान असें आहें कीं, पुराणें महाभारतादि ग्रन्थांत सनकादिकाबरोबर ज्यांना ब्रह्मदेवाचें मानसपुत्र म्हटले आहे ते कपिल ईश्वरवादी आहेत आणि तेच गीतेंतील सिद्ध आहेत. ‘‘सिद्धानां कपिलो मुनि:’’ आचार्यांनी हा भेद ब्रह्मसूत्र-शारिरभाष्याच्या द्वितीय अध्यायांत स्पष्टपणे दाखविला आहे. भागवतांतील विष्णूच्या अंशभूत कपिलांनी आपल्या आईला म्हणजे देवहूतीला जो वेदसंमत सांख्ययोग सांगितला आहे तो सांख्य दर्शनाहून पूर्णतया भिन्न आहे.

**यासाठीं नाइलाजाने जरा कडक शब्दांत सांगतो कीं, गीता स्वत:च्या पायावर मजबूत उभी आहे—कित्येक शतकें. केवळ उपनिषदें आणि नंतर निर्माण झालेल्या ब्रह्मसूत्रांच्या कुबड्या लावून गीतेचें अध्ययन करूं नका. गीतेची साधनापद्धति, गीतेचें वातावरण**

सर्वस्वी भिन्न आहे. तिचें तिच्याच पद्धतीने अध्ययन करा. तौलनिक अध्ययनाचा मोह टाळा. ‘‘गीता सुगीता कर्तव्या किमन्यैः शास्त्रविस्तरैः’’ हे वचन अक्षरशः खरे आहे. वेदोपनिषदो गावो। दोग्धा गोपालनंदनः। पार्थो वत्सः सुधिर्भोक्ता। दुग्धं गीतामृतं महत्।। हें पूर्ण कथन होईल.

करी मस्तक ठेंगणा। लागे संतांच्या चरणा।। या तत्त्वानुसार पूर्वसूरींचा आदर करावा. त्यांच्या वाङ्मयाचें अतिशय आस्थेनें अध्ययन करावे. आपली तर्कशक्ति यामुळें अप्रतिहत होते. जाणण्याच्या क्षमतेंत वाढ होते. Knowing capacity, increase होते. अनेक विचारप्रणालींच्या अध्ययनानें जाणिवेची क्षेत्रें विस्तृत होतात. तात्पर्य असें कीं, त्यांचा अनादर करूं नये. त्यांची खऱ्या अर्थानें दखल घ्यावी. त्यांच्या विशेष अर्थांना बाध येईल असे उद्दामपण करूं नये. मात्र याचा अर्थ असा नव्हें कीं, गीतेचें अध्ययन करतांना तिचें एक खास वातावरण आहे हें विसरून तिला पूर्वसूरींच्या चौकटींत ठोकून बसविण्याचा प्रयत्न करावा. गीतेचें हें वातावरण ज्ञानदेवांनी फार जपलें आहें.

मात्र त्याच ज्ञानेश्वरीला वेदान्ताच्या चौकटींत बसविण्याचा अव्यापारेषु व्यापार अनेकांनी केला आहे. आतां हेंच पहा— गीतेवरील आचार्यभाष्य चुकीचें आहें असें नव्हें, मात्र तें समाधान देणारे नाहीं असा अभिप्राय देणारे हजारोंच्या संख्येने या महाराष्ट्रांत होऊन गेले आहेत. तेंच ब्रह्मसूत्रशारिरभाष्य पहा! त्यांत आचार्यांचा केवढा दांडगा आत्मविश्वास दिसतो! कशी गर्जना आहे! वृत्तपत्राच्या संपादकाप्रमाणे ‘वयं ब्रूमः’ अशी त्यांत भाषा आहे. तेथें आचार्य ज्ञानमार्तण्ड आहेत. मात्र गीतेवरील भाष्याच्या प्रसंगीं पहा! ‘वयं ब्रूमः।’ म्हणजे ‘आम्ही असे म्हणतो’ असे म्हणणाऱ्या आचार्यांनी. ‘‘तदर्थे विज्ञाते समस्त पुरूषार्थ सिद्धिः अतः तत् विवरणे यत्नः क्रियते मया।’’ म्हणजे गीतेचे विवरण करण्यासाठीं माझ्या-कडून प्रयत्न केला जात आहे. अशी अगतिकतेची भाषा त्यांनी वापरली आहे. आणि यामुळेंच कीं काय, ब्रह्मसूत्रभाष्याचा थाट, तो दिमाख गीताभाष्यांत मुळीच राहिला नाही.

त्यांनी गीतेचें तात्पर्य सुयोग्य काढलें आहें. मात्र ऊस पिरगळून संत्र्याचा रस काढावा अशी करामत त्यांनी केली आहे. गीता दुर्विज्ञेयार्थ आहे अशी त्यांनी कबुलीच दिली आहे. गीतेंत पुष्कळशी पदें विवाद्य आहेत. कोणालाहि त्यांचा नि:शंकपणे अर्थ करता आला नाही.

आचार्य अथवा ज्ञानदेव त्यांचा ठामपणें अर्थ देतात हा विरोधाभास नाही कां? गीता दुर्विज्ञेयार्थ म्हटल्यावर अर्थ करण्याचें धाडस कसे होतें? ती पदें सोडून कां देत नाही? त्यांचा निश्चितार्थ करण्यास आम्ही असमर्थ आहोत असा मनाचा मोकळेपणा कां नसावा? याबाबतींत सगळ्यांत आचरट व्यक्ति म्हणजे वामन पंडित. एवढा पंडित असणारा माणूस इतका मूर्ख कसा तें कळत नाहीं!

किं कर्म किमकर्मेति कवयोप्यत्र मोहित:।
तत् ते कर्म प्रवक्षामि यत् ज्ञात्वा मोक्षसेऽशुभात्।।
कर्मणोह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणा।
अकर्मणस्य बोद्धव्यं गहना कर्मणो गति:।। अ.४

एकाहि भाष्यकाराला याचा निश्चितार्थ करता आलेला नाही. ज्याला जो वाटला तो त्याने बेमुर्वत ठोकून दिला आहे.

ईशावास्य उपनिषदांवरील भाष्य आचार्यांनी दोनदां केलें आहें. तेंहि समाधान देणारें नाहीं.

त्यांचें बृहदारण्यकांवरील भाष्य अप्रतीम आणि सरस वठलें आहें. एका वाचनांत तें समजणारें नाहीं. त्यांची बुद्धिमत्ता आणि सखोल ज्ञानाचा तेथें मात्र पूर्ण प्रत्यय येतो.

त्यांतील आचार्यांचें व्यक्तित्त्व मन प्रसन्न करणारें आहें, उन्नत करणारें आहें.



मूळ गीतेचें प्राचीनत्व पुष्कळांच्या लक्षांत येत नाहीं. कारण आचार्यांच्यापासून गेल्या एक हजार वर्षांतील मध्ययुगीन पंडित मंडळींची गीतेकडे पाहण्याची दृष्टि उचित म्हणजेच यथार्थ असूनहि ती एकांगी —नि:संशय एकांगी—असल्यामुळें, म्हणजेच ती पूर्ण दृष्टि नसल्यामुळें इतक्या प्रदीर्घ काळांतहि गीतेला खरा न्याय मिळाला नाहीं. परंपरागत पारमार्थिक क्षेत्रांत एकदां निर्माण झालेली ही स्थिती अद्यापहि तशीच टिकून आहे.

पूर्वसूरी म्हणतात, गीता ही जीवाला संसारांत प्रवृत्त करीत नाही. गीता संसार-निवृत्तिसाठीं निर्माण झालेलें शास्त्र आहें.

वस्तुस्थिती अशी आहे कीं, ही तत्त्वदृष्टि शब्दांत मावत नाहीं. शब्दांच्याच मदतीने शब्द बाजूस सारून अर्थाचें ग्रहण

करायचें असतें. निवृत्तिवादी अक्षरार्थावरच डुकून बसतात, त्यावेळीं त्यांच्या बुद्धीची कींव करावी वाटतें. मोक्ष अथवा मुक्ति हेंच गीतेचें परमोच्च ध्येय आहें. मात्र हें सांगण्याचा निवृत्तिवाद्यांना मुळीच अधिकार नाही. माझ्यामतें तरूण वर्गाने —एवढा व्यापक अर्थ ध्यानीं घेऊन—गीतेकडे पाहण्याचा हा दृष्टिकोन कधीहि नजरेआड होऊं देऊं नयें.

आमचा यांच्याशी मतभेद येथून पुढे सुरूं होतो. हे पूर्वसूरी म्हणतात, गीता उपनिषदांना अनुसरते. इतकेच नव्हें तर यापुढे जाऊन ते म्हणतात, ती उपनिषदांनाच अनुसरते. अनुसरण म्हणजे **To follow** हा अनुसरण शब्द आणि ‘च’ काराची एकमेवतेची भाषा, ही दोन्हीं गृहित धरल्यानंतर म्हणावे वाटतें कीं, पूर्वसूरींचा हा शुद्ध दुराग्रह आहे. इतरांना आपल्या कळपांत ओढण्याचा हा अट्टाहास आहे.

गीतेमध्यें कठ, मुंडक, श्वेताश्वतर अशा केवळ ३/४ उपनिषदांमधील कांहीं पूर्ण श्लोक, श्लोकार्धे आणि कांहीं शब्द जसेच्या तसेच घेतले गेले आहेत. ज्यांना सर्वांत प्राचीन उपनिषदें म्हणतात ती छान्दोग्य आणि बृहदारण्यक, यांचा आणि गीतेचा

अगदीच नगण्य संबंध आहे. आपल्या येथे गोलमोल बोलण्याची एक बेशिस्त पद्धति निर्माण झाली आहे. ऐतिहासिक पूर्वापर संबंधाचें आम्ही इतकें सुतक कां धरतों तें कळत नाहीं!

उपनिषदांतील एवढीं अवतरणें घेऊनहि **गीता उपनिषदांचा एका शब्दानेहि उल्लेख करीत नाहीं; हा विचार करण्यासारखा विषय आहे.** पूर्वसूरींनी यासंबंधी संशोधनांत प्रौढपण तर आणले नाहींच उलट ''श्रीमत्‌भगवत्‌गीतासु उपनिषत्सु ............इत्यादि'' असला गचाळपणाच केला आहे. **महाभारतांत अध्याय-समाप्ति-सूचक हा शब्द समुच्चय मुळींच नाही.**

गीतेंत केवळ तीन वेदांचा उल्लेख मिळतो. ''वेदवादरता: पार्थ नान्यदस्तीतिवादिन:।'' अ० २,४२ त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन'' अ० २,४५ '' तावान् सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानत:'' अ० २,४६ ''त्रैविद्या मां सोमपा:'' अ० ९,२ '' एवं त्रयीधर्म मनुप्रपन्ना।'' अ० ९,२१ ''वेदेषु यज्ञेषु

तपःसु चैव''अ०८,२८ ''नाहं वेदैर्न तपसा''अ०११,५३ ''यदक्षरं वेदविदो वदन्ति'' अ०८,११ ''छन्दांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित्'' अ०१५,१ ''वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो। वेदान्तकृत् वेदवित् एव चाहं'' अ०१५,१५''ओम् तत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः। ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा।। अ०१७,२३ गीतेचा ११वा अध्याय पहा, तेथें तर वेदच अवतरला आहे.

गीतेचा संबंध सरळ वेदवाङ्मयाशीं असलेला दिसतो. समग्र वेदवाङ्मय असा पूर्ण अर्थ गीतेला अभिप्रेत आहे. गीताकालीन परिस्थितीचा नीट अन्वयार्थ लागला तर अनेक गोष्टी अगदी सरळ होतील. गीतेच्या वेळीं तीन वेद समग्र रूपांत होते. संहिता, ब्राह्मणें, आरण्यकें, उपनिषदें असे विभाग मुळींच नव्हतें. उपनिषदांना जास्त महत्व, संहिता अथवा यज्ञभागाला कमी महत्व असा तर-तम भाव नव्हतां. हा वेदाचा प्रथम भाग, हा अंतीम भाग असा प्रकार नव्हतां. तीन वेद मिळून समग्र वेदवाङ्मय अशा दृष्टीनें त्याकडे पाहिले जात असे. त्यामुळें गीता वेदाप्रमाणें समग्र जीवन-दर्शन आहें. गीता प्रवृत्तिवादी नाही आणि निवृत्तिवादीहि

नाही. वेदाप्रमाणेच गीता एक परिपूर्ण मुक्त जीवनानुभव आहे.

सामवेद हा गायनासाठीं असणारा वेद आहे. यांत ऋग्वेद आणि यजुर्वेदांतील मंत्र आलेले आहेत. आजच्या भाषेंत गायनाच्या दृष्टीनें ती त्या मंत्रावर Notations आहेत.

निवृत्तिवादी मंडळींनी गीतेवर कांहीं लिहूच नयें. यांत एक तऱ्हा अशी कीं, प्रवृत्तिवादी मंडळी गीतेवर लिहितात तेव्हां त्यांत अपसिद्धान्त फार असतात आणि निवृत्तिवादी लिहितात तेव्हां ते शास्त्रशुद्ध उचित आणि सुयोग्य लिहितात पण तें लिखाण एकांगी होतें. ते गीतेला न्याय देतांना अनुकम्पा दाखवितात, सहानुभूति दाखवितात. त्यांना सांख्य. निष्ठेविषयीं जेवढी आस्था, आपुलकी, जिव्हाळा, आत्मीयता असते तेवढी आणि तितकी योगाविषयीं नसते. **ते योगनिष्ठेला सांभाळून घेतात. त्याविषयीं ते सहानुभूति दाखवितात, समानानुभूति दाखविणे त्यांना कधीहि शक्य नाहीं कारण याविषयीं ते अपात्र**

आहेत. गीतेशीं त्यांच्याकडून ही प्रतारणाच झाली आहे. यामुळें नाइलाजानें मी लिहिले कीं, निवृत्तिवादी मंडळींनी गीतेवर लिहूंच नये. आचार्यांना ''द्विविधो हि वेदोक्तो धर्मः प्रवृत्तिलक्षणः निवृत्ति-लक्षणश्च।'' गीतेसंबंधीं ही अप्रासंगिक चर्चा करण्याची काय जरूरी होती? वाघ्याचा येळकोट जात नाहीं, तसाच हा प्रकार आहे. ब्रह्मसूत्रावर भाष्य करण्यास आचार्यासारखी सुयोग्य व्यक्ति सप्तखण्डांत मिळणार नाहीं. विश्वाच्या वाङ्मयांत ब्रह्मसूत्रशारिरभाष्यासारखा विद्वत्तापूर्ण आणि दिमाखदार ग्रंथ एकमेवाद्वितीयच आहे. मात्र आचार्यांनी गीतेवर केलेले भाष्य, हा अशोभनीय आणि स्वतःची किंमत घालविण्याचा उद्यम झाला आहे. याविषयीं ज्ञानदेवांनी बाजी मारली आहे. ते पुष्कळच समाधान देणारे आहेत. सूत्रवाङ्मयाची गंधवार्ता नव्हती अशा कालखण्डांत सांख्य आणि योग हे दोन्ही परिपूर्ण साधनमार्ग होते. त्यावेळीं एकाला निवृत्ति, एकाला प्रवृत्ति असा विभाग मुळीच नव्हतां ''ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे'' असें

**योगमार्गाला ठिगळ जोडण्याची कांहींहि जरूरी नाही.** योग हा परिपूर्ण स्वतंत्र मार्ग आहे आणि हा मार्ग अंगोपांगासह समग्रतेनें लोकांना ज्ञात व्हावा म्हणून गीतेची निर्मिती झाली आहे.

"लोकेस्मिन् द्विविधा निष्ठा" अ०३, श्लोक ३ निष्ठा एकच पण ती द्विविधा म्हणजे दोन विधींनी, दोन मार्गांनी प्राप्त होते, असा गीतेच्या म्हणण्याचा रोख आहे. **द्विविधा निष्ठा म्हणजे दोन प्रकारची निष्ठा; हा निवृत्तिवादी अथवा संन्यासी सांप्रदायिकांनी केलेला एकांगी अर्थ आहे.**

योग,'तत्प्राप्ति उपाय' आहे, तसा सांख्य नाही कां? योगाविषयीं ही सापत्नभावाची वागणूक कां? **यांच्या दृष्टीनें, मलीन आणि चंचल चित्तासाठीं जर योग असेल** तर अशा खालच्या दर्जाच्या ग्रंथाचा, दशोपनिषदें आणि ब्रह्मसूत्रें या उच्यकोटीच्या भारदस्त ग्रंथांत समावेश करून प्रस्थानत्रय कां केलें? प्रस्थानद्वयच

अधिक शोभून दिसले असते. हा घाट शंकराचार्यांच्यापूर्वीच कोणीतरी घातलेला दिसतो. कदाचित् यामुळेंच शंकराचार्यांना गीतेवर भाष्य करावे लागलें असेल. अथवा असेंहि असेल कीं, आचार्यपूर्व कालखण्डांत गीतेचा लौकिकदृष्ट्या अनेकविध अर्थ करणारी ज्ञान-कर्म-समुच्चयवादी भाष्यें असतील आणि त्यांचें खंडन करण्यासाठीं त्यांना गीतेवर भाष्य करावे लागलें असेल. मात्र ही सर्व तत्कालीन परिस्थिती आणि त्यांचे सांख्य संन्यासी व्यक्तित्त्व, या सर्वांचा परिणाम झाल्यामुळें आचार्यांचें गीता भाष्य व्याकरण आणि शब्दकोश याप्रमाणे निव्वळ औपचारिक Formal स्वरूपाचें झालें. आहें. गीतेचें हृदय प्रकट करणारें, रहस्य उलगडून दाखविणारें, मुळींच झालें नाहीं. ही सर्व निराशाजनक परिस्थिती ध्यानीं घेतल्यावर म्हणावे वाटते कीं, गीतेवर कोण लिहितो याला फार महत्व आहे. संन्यासी अथवा निवृत्तिवादी लिहितो कां? तर तो ग्रंथ कसलाच विचार न करतां फेकून द्यावा कारण योगनिष्ठेच्या संदर्भांत हे लोक अप्रमाण आहेत. गीता म्हणते, ‘‘एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमां

शृणु।'' याचा अन्वय असा— 'एषा ते सांख्ये बुद्धि अभिहिता योगे तु इमां शृणु।' येथे सांख्ये आणि योगे ही सप्तमी विभक्ति आहे. दुसरें असें कीं, बुद्धि एकच आहे. सांख्य आणि योगाचे संदर्भ वेगळे आहेत. पण दोहोंतील बुद्धि एकच आहे. बुद्धि वेगळी नाही. दोन बुद्धींचा संन्यासी सांप्रदायिकांनी केलेला अर्थ चुकीचा आहे. ज्ञाननिष्ठा आणि कर्मनिष्ठा अशा दोन निष्ठा आहेत असे हे सांप्रदायिक म्हणतात. गीतेला तुम्हीं किती खाली ओढतां! तो काय कर्मकांडावरील ग्रंथ आहे? 'कर्मनिष्ठा' असा अनाठायीं शब्द-प्रयोग गीतेच्या संदर्भांत करतां, हें शोभतें तुम्हाला? गीतेचें मोक्ष हें परमप्रयोजन आहें असें म्हणतां आणि त्याच गीतेंतील योगाला कर्मनिष्ठा म्हणतां; ही गांडुळासारखी दुतोंडी भाषा कशी केली जाते? कळत नाही! नीट विचार केल्यास 'दालमें काला'काय आहे तें इथे जाणवते. गीतेचें परमप्रयोजन असें जें निःश्रेयस तें कोणत्या साधनानें प्राप्त होईल, याविषयीं आचार्य काय म्हणतात पहा—

''तत् च सर्वकर्मसंन्यासपूर्वकात् आत्मज्ञाननिष्ठारूपात् धर्मात् भवति'' योगाला मुरगळून संन्यासांत कोंबावा तसा हा प्रकार झाला आहे. उस पिरगळून संत्र्याचा रस काढावा तशी ही करामत आहे. गीताभाष्यांत आचार्यांनी अक्षम्य अपराध केला आहे आणि असे अनुचित भाष्य करून त्यांनी गीतेला प्रस्थानत्रयाची भलतीच दिशा दिली आहे. टिळकांचें गीतारहस्य कांहीं अंशात अशास्त्रीय झालें आहें. 'अरेला कारे' या दृष्टीनें टिळकांनी शुभारंभ चांगला केला आहे. आचार्यांचें शीर्षासन केलेलें रूप म्हणजे लोकमान्य. दोन्हीहि हट्टाग्रही आहेत. आपला मूळ विषय —''एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे.....''. बुद्धि म्हणजे ज्ञान, हाहि त्यांचा अर्थ चुकीचा आहे. सांख्य हा मार्ग ते समजत नाहीत. त्याला सांख्यनिष्ठा, पूर्ण ज्ञान असे ते समजतात. बुद्धि म्हणजे दृष्टि. Attitude. दृष्टि बदलली कीं, सृष्टि बदलते. गुरू फक्त ज्ञानाची दृष्टि देतो, ज्ञान ज्याचें त्यानेच मिळवायचें असतें.''तत् स्वयं योगसंसिद्ध: कालेनात्मनिविंदति।'' याचा कोणी

सरळ अर्थ करीत नाहीत. संन्यासी पंथ गीतेवर लिहिण्यास अपात्र आहे.

त्यांची गीतेवरील अध्यायांची नांवेहि चुकीची आहेत.

सांख्ययोग अ०२ ज्ञानकर्मसंन्यासयोग अ०४ संन्यासयोग अ०५ अशी नांवे देऊन निवृत्तिवादी अथवा संन्यासी संप्रदायाने गीतेंत हवी तशी मनमानी केली आहे. याचाच परिणाम आणि प्रतिक्रिया म्हणून टिळकांच्या सारखा अत्याग्रही निर्माण झाला. ही काळाचीच गरज होती, मागणी होती. **मागे म्हटल्याप्रमाणे लोकमान्य टिळक म्हणजे आचार्यांचें शीर्षासन केलेलें रूप आहें.** लोकमान्यांनी महाराष्ट्रांत सर्वप्रथम आवाज उठविला. याविषयीं त्यांचे आभार मानावेत तेवढे थोडे आहेत. गीतारहस्यावरील टीका-प्रतिटीकामुळें महाराष्ट्राच्या बुद्धीला जी विलक्षण धार आली आणि चिंतनाची जी गहनता प्राप्त झाली, त्याला तोड नाही. हें टीका-प्रतिटीकांचें तुंबळ युद्ध या पुण्यनगरींत ३० वर्षें गाजलें. यासंबंधीचे ग्रंथ, विविध लेख इत्यादि सर्व वाङ्मय मी तपशिलांत जाऊन बारकाईनें अभ्यासलें. संपूर्ण १ वर्ष, १९६५ मी यासाठीं दिलें. वर्षभर मला हा एक भुंगाच

लागला होता. रामचंद्रबुवांनी मला त्या वर्षांत अनेकवेळां टोकलें. पण मी त्याला दाद दिली नाही. हें वेड वर्षभर मी कळसाला नेलें. गीतारहस्याच्या विवरणाची पद्धती अशास्त्रीय असली तरी त्यांतून टिळकांची पोटतिडिक मला पूर्णांशानें जाणवली. हें त्यांचें महाराष्ट्राला फार मोठे योगदान आहें. लोकमान्यांच्यामुळें महाराष्ट्रांत गीतेच्या अभ्यासाला फार मोठी चालना मिळाली. त्यावेळच्या विविध क्षेत्रांतील सुशिक्षित वर्गाचें लक्ष गीतेच्या अभ्यासाकडे लागले, हा एक चमत्कारच घडला. गीतारहस्यामुळें महाराष्ट्रांत आचार्यांच्या तत्त्वज्ञानाचा सखोल अभ्यास सुरूं झाला. गीतारहस्यांतील ''कपिल सांख्य आणि क्षराक्षर विचार,'' ''विश्वाची उभारणी व संहारणी'' आणि नंतरचें ''अध्यात्म'' हीं प्रकरणें. यावर महाराष्ट्रांतील शास्त्रीवर्ग अतिशय प्रसन्न आहे. इतके असूनहि गीतेच्या संदर्भांत लोकमान्य आचार्यांना निश्चितपणें प्रतिक्रियावादी आहेत. ज्ञानदेवांना असा

एकहि प्रतिक्रियावादी झाला नाही. हां, याला एक अपवाद आहे, वामन पंडित. पण तो मूर्ख ठरला आहे. केवळ महाराष्ट्रांतच नव्हें तर संपूर्ण भरतखण्डांत गीतेच्या संदर्भांत ज्ञान-देवांचें स्थान एकमेवाद्वितीय आहें, यांत मुळीं सुद्धां संशय नाही. स्वर्गीच्या देवांनाहि हेवा वाटावा असें हें महाराष्ट्राचें भाग्य आहें. संन्यासी सांप्रदायिकांनी गीतेच्या अध्यायांना किती चुकीची नांवें दिली आहेत ती आपण वर पाहिली. हे पाहून चीड येते. उगीच नाही टिळकांनी ठणाणा केला! टिळकांना विषय नीट मांडता आला नाही, शिवाय त्यांत अशास्त्रीयता बरीच आलेली आहे, तरीहि टिळकांचे म्हणणे अगदी बरोबर आहे. ‘‘दशोपनिषदें, ब्रह्मसूत्रें आणि भगवद्गीता यांना वेदान्त शास्त्रांतील प्रस्थानत्रय म्हणतात’’ केवढा आगावपणा आहे हा! या आचरटपणाला प्रथम कोणी सुरवात केली? सूत्रवाङ्मयाची गंधवार्ता नव्हती अशा

प्राचीन कालखण्डांतील गीता आहे. तिला प्रस्थानत्रयांत बसविण्याचा अधिकार तुम्हांला कोणी दिला?

निवृत्तिवादी अथवा संन्यासी लोकांनी गीतेवर लिहूच नये. ती अगदी बाजूस ठेवावी. गीतेवाचून त्यांचे कांहीं अडत नाही. गीतेवर लिहिण्याचा त्यांना कसलाहि हक्क नाही. ते अगदीच अनधिकारी आहेत. इतकेच नव्हें तर ते अपात्रहि असल्याचे स्पष्ट दिसून येतें. आचार्यांच्यापासून गीतेवर जीं भाष्यें झालीत तीं काय भाष्यें आहेत? ज्ञानदेवांची एक ज्ञानदेवी सोडली तर सगळी भाष्यें गचाळ आहेत. भाष्य लिहून तुम्ही गीतेवर मेहेरबानी करूं नका. या लोकांनी गीतेची वाट लाऊन प्रस्थानत्रयांत तिला ठोकून बसविली आहे. त्यांनी अध्यायांची नांवेहि जाणूनबुजून दिली आहेत. माझी नांवे अशी आहेत—

समग्र योग अ०२, योग सहाय्यकारी कर्मयोग अ०३, ज्ञानप्रधान उपासना योग अ०४, पूर्ण योग अ०५.

अध्याय ४ चे स्पष्टीकरण असे आहे—

योगसंशय छेदकारी ज्ञानप्रधान उपासना योग.

तस्मात् अज्ञानसंभूतं हृस्थं ज्ञानासितात्मना ।
छित्वैनं संशयं योगं आतिष्ठोत्तिष्ठ भारत ।।

योगं आतिष्ठ। म्हणजे अर्जुना, तूं योगाचा अवलंब कर. युद्धाचा अवलंब कर असे सांगितले नाहीं. भारत उत्तिष्ठ। अर्जुना, युद्धांसाठीं उठ. असे लगेच गीता सांगते कारण या दोन्हीं वक्तव्याचें गीतेला समान मूल्य आहे. गीता त्यांत तर-तम भाव करीत नाही. योगमार्गांत कर्माशिवाय मोक्ष नाही. दुसऱ्या शब्दांत कर्म टाळून मोक्ष मिळणें शक्य नाहीं. गीतेचें पूर्ण कथन असें आहें कीं, कर्माशिवाय मोक्ष नाही मात्र कर्मानें मोक्ष नाही. कर्माचें अतिशय आणि एवढे महत्व असूनहि कर्माचें गौणत्व चुकत नाही. मात्र महत्व आणि गौणत्व यांत गीता तर-तम भाव करीत नाही. ‘दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगात्

धनंजय’। असे म्हणूनहि कर्माचा आदर गीतेइतका कोणीहि केला नाही आणि हे गीताच करूं जाणे! ‘कर्मानें चित्तशुद्धि आणि ज्ञानानें मोक्ष’ असे तोडूनपाडून बोलणाऱ्या म्हणजे अशी भाषा वापरणाऱ्या संन्यासी अथवा निवृत्तिवादी लोकांना रसिक म्हणता येईल काय? या लोकांना समतोल लिहिताच येत नाही. त्यांचा जन्मच त्यासाठीं नाही. आणि समतोल कशासाठीं लिहायचे? कारण गीता योगावरील ग्रंथ आहे, सांख्यावरील ग्रंथ नाही. त्यामुळें समतोल लिहिण्याचा प्रश्नच येत नाही. गीता खास योगमार्गासाठीं म्हणजे योग मार्गाचें सांगोपांग विवरण करण्यासाठीं निर्माण झालेला ग्रंथ आहे. योगाबरोबर सांख्यांचा उल्लेख अशासाठीं कीं, दोहोंमध्यें एकच तत्त्व अनुस्यूत आहें हें ध्यानीं यावे आणि साधकाने योगमार्गांत संशयरहित अग्रेसर व्हावे. गीतेंतील सांख्यांच्या उल्लेखांचा गैरफायदा घेऊन संन्यासी अथवा निवृत्तिवादी संप्रदायाने राजरोस आपली मनमानी केली आहे. हे लोक गीतेवर लिहित नाहींतच. गीतेचें निमित्त

करून हे आपलाच नाऱ्या नाचवतात. भारतांतील सगळाच परमार्थ-पथ जीवन-विरोधी झाला आहे. याचें कारण बुद्धापासून संन्यासी आणि निवृत्तिवादी. लोकांचें प्राबल्य, मध्ययुगीन निवृत्तिवादी पंडित मंडळी आणि संतमंडळादि परमार्थी फार मोठा समुदाय, यांचेमुळें आज अडीच हजार वर्षे एकसारखे टिकून आहे. याची तीव्र प्रतिक्रिया या स्वरूपांत टिळकांचें गीतारहस्य निर्माण झालें. मात्र त्यांनी दुसरें टोक गाठलें. त्या बाजूनेहि अतिरेक झाला आहे. प्रवृत्तिवादाचा आग्रह हें ज्ञानलक्षण नव्हें, अज्ञानलक्षण आहें. निवृत्तिवादहि परिपूर्ण अज्ञानजन्यच आहे, पण तो तसा लक्षांत येत नाही.

सगळे जगच प्रवृत्तींत अडकल्यामुळें निवृत्तिवादाला ज्ञानाचा भ्रम होऊं

शकतो यामुळें त्यांत आत्मवंचनेला पारावार रहात नाही.

गीतेविषयीं आस्थेनें, आत्मीयतेनें, तिची खरी बूज राखणारे एकमेव Care-taker ज्ञानदेवाशिवाय दुसरें कोणीहि दिसत नाहींत.

भारतांतील पारमार्थिक क्षेत्रांतला हा तमाशा पाहतां ज्ञानदेवांना Distinction ने उत्तीर्ण करणे अपरिहार्य आहे.

गीता म्हणते,''मा ते सङ्गोऽस्त्वकर्मणि''

'अकर्मणि ते सङ्गः मा अस्तु ।' हें विद्यर्थी रूप आहे, आज्ञार्थी नाही. अकर्मी वासना नसावी, असा याचा अर्थ आहे. योगमार्गांत मुमुक्षुत्व ही वासना ठरते. अकर्म म्हणजे नैष्कर्म्य म्हणजे मोक्ष. मोक्ष अथवा मुक्ति जर सिद्ध स्थिती आहे तर

तिच्या वासनेनेहि ती दुरावेल; हाच अर्थ 'अकर्मणि ते सङ्गः मा अस्तु' यांत आहे. निष्कामता हाच गीतेचा संदेश आहे, हेंच जीवनाचेंहि उद्दिष्ट आहें, हाच जीवनाचा हेतू आहे. जीवन-प्रवाहांत कर्म व्यक्त असो वा अव्यक्त असो, निष्कामता हेंच खरें जीवन-सूत्र आहें योगमार्ग मोक्षेच्छेकडे पाठ फिरवितो ''न मागे तयाची रमा होय दासी'' हें निष्कामतेचें स्वरूप आहें. आणि हीच योगबुद्धि आहे. हेंच योग-सार आहें.

कां रे पुंड्या मातलासी । उभे केले विठ्ठलासी ।।
ऐसा कैसा रे तूं धीट । मागे भिरकाविली वीट ।।

हे पहा, योगमार्ग मोक्षेच्छेकडे कसा पाठ फिरवितो.

विहाय कामान् यः सर्वान् पुमान् चरति निःस्पृहः ।
निर्ममो निरहंकारः स शांतिं अधिगच्छति ।।

लोकमान्यांनी ‘चरति’ याचा अर्थ ‘विषयान् चरति’ असा केला आहे. तो चूक नाही, पण तें व्यावर्तक लक्षण होईल. तें सर्वसमावेशक मानलें जाणार नाहीं. ‘चरति’ हा शब्द एकूण जीवन-विहाराला लावावा लागेल.

ज्ञानदेवांनी शब्दावर अर्थाचा भार पडणार नाही अशा खुबीने यांतून वाट काढली आहे.

“ विचरें विश्व होऊनी विश्वामाजीं। ”

---

“जीवन-प्रवाहांत कर्म व्यक्त असो वा अव्यक्त असो”
याचे स्पष्टीकरण

कर्म मातृकम् अकर्म। द्वीरूपं तु। व्यक्त लिंगम् एकम्। अव्यक्तम् लिंगम् अपरम्। अनिर्वचनीयम् उभयम्। बिंदू देवतादिवत्। शुकजनकयो: एक: पन्था:। वैशेषन्तु। अध्याय ५ चें हें असें सूत्रबद्ध स्पष्टीकरण.

---

# {५}

गीता कोणत्या कालखण्डांत निर्माण झाली? म्हणजे गीतेचा काळ कोणता? यासाठीं प्रथम भारतीय युद्धाचा काल ठरविल्यास तोच गीतेचाहि काल ठरेल. शालिवाहन शकाच्या पंचांगानुसार भारतीय युद्धाचा काल इसवीसनपूर्व ३१०२ येतो. म्हणजे ३१०२ + २०१५ = ५११७ वर्षांपूर्वी भारतीय युद्ध संपून युधिष्ठिराला राज्याभिषेक झाला; तेव्हांपासून युधिष्ठिरशक सुरूं होतो. हा दाते यांच्या पंचांगात वापरण्यांत आला आहे. युधिष्ठिराला राज्याभिषेक झाला, त्यावेळीं कृष्णद्वैपायन व्यास उपस्थित होते. त्यांनी, युधिष्ठिराला युद्धांत मिळालेल्या जयाला उद्देशून 'जय' नामक ग्रंथ लिहिला. त्यांत गीता समाविष्ट होती

हें पुढील श्लोकावरून उघड दिसतें.

नारायणं नमस्कृत्य नरंचैव नरोत्तमम्।
देवीं सरस्वतीं व्यासं ततो जयमुदीरयेत्।।

मात्र हा भारतीय युद्धाचा काल पुष्कळांना मान्य नाही. केसरीचे संपादक तात्याराव करंदीकर, 'भारतीय युद्धाचा कालनिर्णय' या आपल्या पुस्तिकेंत लिहितात,''भारतीय युद्धानंतर परिक्षिताचा जन्म झाला. तेथपासून महानंदाच्या अभिषेकापर्यन्त बार्हद्रथ वंशाची १००६ वर्षें, प्रद्योत वंशाची १३८ वर्षें, शैशुनाग वंशाची ३६० वर्षें मिळून १५०४ वर्षें झाली. तेथून नंदाची कारकीर्द १०० वर्षें आणि चंद्रगुप्तमौर्याचा राज्याभिषेक इसवीसन पूर्व ३२८ वर्षीं झाला. या सर्वांची बेरीज केल्यास १९३२ येते. यावरून फलज्योतिष शास्त्रदृष्ट्या ठरविलेला भारतीय युद्धाचा काल आणि पुराणांतील व इतिहासांतील वंशावळी-वरून ठरविलेला काल अगदी सारखे येतात. असा दुहेरी मेळ कुठल्याहि

वर्ष-निर्णयाशीं जुळत नाहीं. म्हणून इसवीसनपूर्व १९३१ हा भारतीय युद्धाचा काल संशयातीत समजावा. यांत एक वर्ष कमी करावे लागतें. याचें स्पष्टीकरणाचा व्याप करीत नाहीं. कारण हा लेख त्यामुळें मर्यादेबाहेर वाढेल. असो.

आतां असें पहा कीं, पंचांगातील काल आणि हा काल यांत ३१०२ – १९३१= ११७१ म्हणजे एक हजार वर्षांपेक्षांहि जास्त अंतर पडतें. लोकमान्य टिळकांनी हा युद्धकाल इसवीसन पूर्व १४०० वर्षें म्हणजे आणखी ५०० वर्षें अलिकडे आणला आहे. तो निराधार आहे.

भारतीय युद्धाच्या कालनिर्णयासंबंधीं विद्वानांच्यामध्यें एवढा मतभेद आहे तर वेदकालनिर्णय किती विवाद्य विषय असेल याची सामान्य माणसाला कल्पनाहि करता येणार नाही. या सर्व विद्वानांचा सुवर्णमध्य काढून मी एक चार्ट, एक तक्ता तयार केला आहे तो असा—

१ वेद, संहिता— आज ज्या स्वरूपांत उपलब्ध आहे तशी ती ६,५०० वर्षांपूर्वी निःसंशय अस्तित्त्वांत होती. ही संहिता विभागाची उत्तरमर्यादा अगदी कमीतकमी धरली आहे. यांत सर्व पक्षांच्या विचारांची दखल घेतलेली आहे. ही उत्तर मर्यादा कोणी कितीहि बुद्धि लढविली तरी अलिकडे आणतां येणे शक्य नाही. आतां राहिली वेदसंहितेची पूर्वमर्यादा, तिचा निर्णय करणें आजघडीला तरी मानवी बुद्धीच्या आवाक्याबाहेरचे आहे याचें कारण ''अनादि निधना नित्त्या वागुत्सृष्टा स्वयंभुवः।।'' हेंच आहें.

२ ब्राह्मणग्रंथकाल— ५ हजार ५०० वर्षें. ही उत्तरमर्यादा

३ उपनिषदें— ५००० वर्षें. उत्तरमर्यादा.

४ जय— भारतीय युद्ध झालें आणि २/३ वर्षांत 'जय' ग्रंथ तयार झाला त्याला आजमितीला ४००० वर्षें झालीं. हा एक निश्चित काल आहे. येथे पूर्वोत्तर

मर्यादेचा प्रश्न नाही.

५ सूत्रवाङ्मय— याला आज ३ हजार ५०० वर्षें झाली. याच कालखण्डांत 'जय' ग्रंथाचें संस्करण होऊन ''भारत'' तयार झालें आणि जयान्तर्गत गीतेचें संस्करण होऊन भारतान्तर्गत मूळ गीता तयार झाली.

६ बुद्ध जन्म इसवीसन पूर्व ५६० व्या वर्षी झाला. यानंतर वयाच्या ६० व्या वर्षी बुद्ध पूर्ण ज्ञानी व प्रौढ होते. हा काल इसवीसन पूर्व ५०० येतो. म्हणजे अडीच हजार वर्षांपूर्वी बुद्धांनी या भारत देशांत धर्मचक्र-प्रवर्तनाचें कार्य पूर्ण केलें.

७ महाभारत— भारताचें संस्करण होऊन महाभारत तयार झालें. आणि भारतान्तर्गत गीतेचें संस्करण होऊन हल्लीची गीता १८ अध्याय ७०० श्लोक असलेली तयार झाली. महाभारत २ हजार ४०० वर्षांपूर्वी तयार झालें. महाभारतांत बुद्ध संप्रदायांतील स्तूपांचा आणि

विहारांचा उल्लेख येतो. बुद्ध निर्वाण इसवी सनपूर्व ४८० व्या वर्षीं झालें यानंतर ७०/८० वर्षांत बुद्धसंप्रदाय हिंदुस्थानभर पसरला आणि याचवेळीं महाभारत व हल्लीची गीता तयार झाली. आज उपलब्ध असलेला १८ पर्वें आणि २४००० श्लोकांचा महाभारत ग्रंथ २ हजार ४०० वर्षांपूर्वीं तयार झाला. याचा सरळ अर्थ असा कीं, हल्लीची गीता ख्रिस्तजन्मापूर्वीं म्हणजे इसवीसनापूर्वीं ४०० वर्षें अस्तित्वांत होती; इतकी ती प्राचीन आहे. भारतान्तर्गत मूळ गीता तर आणखीनच प्राचीन आहे. कारण ती बुद्धपूर्व १००० वर्षें अस्तित्त्वांत होती. यामुळेंच ती तयार होऊन आजमितीस ३ हजार ५०० वर्षें झाली. आणि तत्पूर्वींच्या ‘जय’ ग्रन्थांतील गीतेला आज ४००० वर्षें झाली. पुराणग्रंथ पहिल्या आणि दुसऱ्या शतकांतील आहेत.

# {६}

आतां गीतोपदेश कधीं झाला? याचा निर्णय करण्यासाठीं प्रत्यक्ष युद्धारंभ कधीं झाला त्या तिथीची निश्चिती व्हावयास हवी आहे. महाभारतांतील यासंबंधीच्या उल्लेखानुसार पुढील अनुमान होतें—

कार्तिक शुद्ध १२ द्वादशी, रेवती नक्षत्र. या दिवशीं कृष्ण उपप्लव्याहून शिष्टाईसाठीं निघाले.'कौमुदे मासी०'

कार्तिक वद्य ५ पंचमी, पुष्यनक्षत्र. शिष्टाई फिसकटली. कौरवांची युद्धाची घोषणा. कृष्ण हस्तिनापुरांत परत आले.

त्याच दिवशीं बलरामाचें तीर्थयात्रागमन. दोन्ही सैन्यांचें युद्धभूमीकडे प्रयाण. कार्तिक वद्य अमावास्या, ज्येष्ठानक्षत्र. रणावर शिबिरें

बांधण्यास प्रारंभ.

मार्गशीर्ष शुद्ध १३/१४ त्रयोदशीसह चतुर्दशी, तिथीची वृद्धि झाली आहे; मृगराशीनक्षत्र. युद्धास आरंभ.

मार्गशीर्ष वद्य ८ अष्टमी, भीष्मपतन. युद्धाचा १० वा दिवस.
मार्गशीर्ष वद्य १३ त्रयोदशी, द्रोणांचा वध. युद्धाचा १५वा दिवस.

मार्गशीर्ष अमावास्या, दुर्योधन वध. युद्धाचा अखेरचा १८ वा दिवस.

महाभारतांतील हे उल्लेख पहा—

अर्जुनेन हतो भीष्मो मार्गमासेऽसिताष्टमी।
नवम्यां वृषसेनस्तु हतो राजा महाबलः।।

दशम्यामपि सौभद्र एकादश्यांजयद्रथः।
द्वादश्यां अर्धरात्रौच हतो वारा घटोत्कचः।।

त्रयोदश्यां तु माध्यान्हे भारद्वाजो निपातितः।
चतुर्दश्यां तु संध्यायां कर्णो वैकर्तनो हतः।।

ततः प्रभातसमये विराटद्रुपदौ हतौ।
अमावस्यां तु माध्यान्हे निहतः शल्य एव च।।

अमावस्यां प्रवृत्तायां राजा दुर्योधनः हतः।
ततः प्रभातसमये द्रौणिना सौप्तिके हतः।।

धृष्टद्युम्नौ हताश्चात्र द्रौपद्याःपंच चात्मजा।
धर्मक्षेत्रे च ये तस्मिन् कुरूक्षेत्रे महाबलाः।।

याविषयीं कांहीं मतभेद असले तरी युद्धारंभ मार्गशीर्ष शुद्ध १३/१४ त्रयोदशीसह चतुर्दशी, मृगराशीनक्षत्रीं झाला. ही गोष्ट अबाधित आहे तसेच भीष्मपतनाची तिथी, मार्गशीर्ष वद्य ८ अष्टमी हीहि संशयांतीत आहे.

रणावर शिबिरें बांधण्यास सुरवात कार्तिक अमावास्येस झाली आणि प्रत्यक्ष युद्धारंभ मार्गशीर्ष शुद्ध त्रयोदशीसह चतुर्दशी. म्हणजे रणभूमी-वर १३ दिवस मोकळें मिळतात. हे सगळे दिवस युद्धाच्या तयारींत सर्वांचेच गेले असें मानावयास हवे. युद्धारंभापूर्वी शेवटचे १/२ दिवस कृष्णार्जुनाचें युद्धाविषयीं मनमोकळे बोलणें चाललें असेल. त्यावेळीं दोन्हीं सैन्यांमध्यें रथ नेऊन कृष्णाने अर्जुनाला विचारले असेल,

‘‘ भीष्मद्रोणप्रमुखत: सर्वेषांच महिक्षिताम् ।
उवाच पार्थ पश्यैतान्समवेतान्कुरूनिति ।। ’’

आपणाला कोणाबरोबर युद्ध करायचें आहे हें काय अर्जुनास माहीत नव्हतें? पण प्रत्यक्ष दर्शनाचा परिणाम किती जीवघेणा होतो, त्याचें प्रत्यन्तर

म्हणजे अर्जुनाची झालेली अवस्था आहे. यानंतर सारांशरूपानें कां होईना एक दोन दिवस कृष्णार्जुनाचा संवाद झाला असला पाहिजे. प्रत्यक्ष युद्धारंभ मार्गशीर्ष शुद्ध त्रयोदशीसह चतुर्दशी, हें ध्यानीं घेतां गीतोपदेशाचा समय मार्गशीर्ष शुद्ध एकादशी आणि द्वादशी हाच येतो.

मार्गशीर्ष शु० ११, एकादशी; ‘‘गीताजयंती’’ पंचांगात कित्येक शतकें चालू आहे, तीच योग्य आहे, असे मला वाटतें.



गीता महाभारताच्या भीष्मपर्वांत अध्याय २५ ते ४२ यांच्यांत आली आहे. तत्पूर्वीच्या २१ ते २४ अध्यायांत—

कौरवांची मोठी सेना पाहून युधिष्ठीरास विषाद वाटला. भीष्मांनी रचिलेला अभेद्य व्यूह पाहून तो निस्तेज झाला. ''अर्जुना, ज्यांचा प्रधान योद्धा भीष्म आहे त्या धृतराष्ट्रपुत्राशीं युद्ध करता येणें आम्हाला कसे शक्य आहें? आम्ही आज जीवितसंशयास प्राप्त झालो आहोत. या व्यूहापासून आमचें रक्षण कसे होईल?'' असे युधिष्ठिराचे निराशेचे उद्गार आहेत. त्यावर अर्जुनाने धीर देत त्याला म्हटले—

युद्ध्यध्वमनहंकारो यतो धर्मस्ततोजयः ।
एवं राजन् विजानीहि धृवोऽस्माकं रणे जयः ।।

यथा तु नारदः प्राह यतः कृष्णस्ततो जयः ।
गुणभूतो जयः कृष्णे पृष्ठतोऽभ्येति माधवम् ।।

पुरूषः सनातनमयो यतः कृष्णस्ततो जयः ।
तस्य ते न व्यथां काचित् इह पश्यामि भारत ।।

यस्य ते जयमाशास्ते विश्वभुक् त्रिदिवेश्वरः ।।

याचा अर्थ—''तुम्ही अहंकार सोडून युद्ध करा. जिकडे धर्म तिकडे जय असे हे राजा तूं जाण. रणांत आमचा विजय निश्चयाने होणार. कारण नारदाने जिकडे कृष्ण तिकडे जय असे सांगितले आहे. जय कृष्णाचा अंगभूत गुण आहे. तो माधवाच्या मागोमाग जात असतो. जिकडे सनातनमय कृष्ण पुरूष असतो तिकडे जय असतो. यास्तव हे राजा, तुला कोणत्याहि प्रकारची व्यथा होण्याचें कारण दिसत नाहीं. कारण विश्वभोक्ता त्रिदिवेश्वर तुझ्या विजयाची आकांक्षा करीत आहे'' हे ऐकून युधिष्ठिरादिक युद्ध करावयास निघाले.

रणांगणांत गेल्यावर कृष्णाने अर्जुनाला त्याच्या हितासाठीं शुचिर्भूत आणि रणाभिमुख होऊन शत्रूच्या पराभवासाठीं दुर्गेचें स्तोत्र म्हणण्यास सांगितले त्याप्रमाणे अर्जुनाने हात जोडून दुर्गेचें स्तोत्र म्हणण्यास प्रारंभ केला त्यावेळीं दुर्गा अंतरिक्षांत प्रकट झाली आणि म्हणाली,

स्वल्पेनैव तु कालेन शत्रून्जेष्यसि पाण्डव ।
नरस्त्वमसि दुधर्ष नारायण सहाय्यवान् ।।

अजेयस्त्वं रणेऽरीणां अपि वज्रभृत:स्वयं ।।

यानंतर २३ व्या अध्यायांत असें श्लोक आहेत——

लब्ध्वा वरं तु कौन्तेयो मेने विजयमात्मना ।
आरूरोह तत: पार्थो रथं परमसंमतम् ।।
कृष्णार्जुनौ एकरथौ दिव्यौ शंखौ प्रदध्मतु:।।

यानंतर २४ व्या अध्यायांत धृतराष्ट्राने संजयाला असा प्रश्न केला कीं, ‘‘माझे पुत्र व पाण्डुपुत्र यांतील कोणत्या योध्यांनी शत्रूवर अगोदर प्रहार केला? युद्धाचा उत्साह व शुभचिन्हें कोणत्या पक्षांमध्यें दिसत होती?’’ यावर संजयाने अशा स्वरूपाचें वर्णन केले— दोन्हीं सैन्यांतील योद्धे हृष्ट झाले आहेत. मला दोन्हीं सैन्यांत एकसारखाच उत्साह आणि एकसारखीच शुभचिन्हें दिसत आहेत. दोन्हीं सैन्यांत शंखादि वाद्यांचा तुमुल शब्द झाला आहे.

यानंतर २५ व्या अध्यायांत

धर्मक्षेत्रे कुरूक्षेत्रे समवेता युयुत्सव:।
मामका: पाण्डवाश्चैव किमकुर्वत संजय।।

येथून श्रीमद्भगवद्गीता सुरूं झाली.

शास्त्रीमंडळींचें म्हणणें असें कीं, यानंतर अर्जुनाला मोह झालेला दाखविला हें जरा चमत्कारिक

दिसतें, असे म्हणून त्यांनी या प्रसंगाची उपपत्ती अथवा संगती दिली आहे. माझ्या मतें अर्जुनाला स्वजनमोह झाला हें चमत्कारिक नव्हें; असें होऊं शकतें. शास्त्रीमंडळींचें मानसशास्त्र कच्चे आहें. मानस शास्त्रानुसार प्रत्यक्ष दर्शनाचा परिणाम फार भयानकहि होऊं शकतो, हा वेळेकाळेचा गुण आहे. मनुष्य मोहग्रस्त केव्हां आणि कोठें होईल याचा तर्कशास्त्रीय नियम नाही.

युधिष्ठिर कौरवांची प्रचंड तयारी आणि व्यूह-रचना पाहून भयभीत झाला आहे. अर्जुनाची स्थिती तशी नाही. विजयाविषयीं त्याला संशय नाही. तो पूर्ण निर्भय आहे. समोर असणारे शत्रूपक्ष तर आहेतच पण हें सगळे अगदी जवळचें जिवाभावाचें आप्तेष्ट आहेत आणि त्यांना मारावे लागणार म्हणून तो व्याकूळ झाला आहे. तर मग हें

त्याला अगोदर माहीत नव्हतें कां? पुन्हा तोच प्रश्न फिरून आला. अचेतन मनांतील गुप्तसुप्त मोहजाल केव्हां प्रकट होईल याची चेतन मनाला कधीहि कल्पना येऊं शकत नाही.



बुद्धकालापूर्वी 'भारत' ग्रंथ तयार झाला. या भारतांतर्गत गीतेला मूळ गीता म्हटली जाते. वास्तविक ही मूळ गीता नव्हें. तर 'जय' ग्रन्थांत समाविष्ट झालेली सर्व प्रथमची गीता ही खरी मूळ गीता आहे. **असें असतांहि संस्करण झालेली गीता ही बुद्धकालापूर्वी १ हजार वर्षें अस्तित्त्वांत होती; यासाठीं 'जय' ग्रंथाचा संदर्भ सोडून तिलाच मूळ गीता म्हटली जाते.**

खरी स्थिती अशी आहे कीं, 'जय' ग्रंथ व तदन्तर्गत गीता, नंतर 'जया' वर संस्करण होऊन तयार झालेला 'भारत' 'ग्रंथ आणि तदन्तर्गत गीता या दोन्हींहि आज जगतीतलावरून नष्ट झाल्या आहेत. पूर्वी मुद्रणकला नव्हती. ग्रंथ हातानें नकलून घेत असत. नालंदा आणि तक्षशीला या विद्यापीठांच्या ग्रंथालयांत असे हस्तलिखित ग्रंथ हजारोंनी होते. ग्रंथांची संस्करणें करण्याची पद्धति या भारतवर्षांत पूर्वीपासून होती. संस्करण म्हणजे अपपाठ काढणें, शुद्धपाठ घालणें. सरळसाधे शब्द काढणें, तेथें अधिक व्यापक आणि गहन अर्थ समावेशक

शब्दांची योजना करणें वगैरे. असे हें पाठसंशोधन म्हणजे संस्करण. आजच्या भाषेंत बोलायचे झाल्यास 'जय' ग्रंथाची मूळ आशयाला धक्का न लावतां सुधारित आवृत्ति सूत्रकालांत तयार झाली. म्हणजे इसवी सन पूर्व ३५०० वर्षें अथवा बुद्धपूर्व १००० वर्षें. आणि अशी ही सर्वांगसुंदर आवृत्ति तयार झाल्यावर मूळ ग्रंथांच्या नकला करण्याकडे दुर्लक्ष होत गेलें. नंतर-नंतर त्यांच्या नकला करणेंहि कमी-कमी होत जाऊन नंतरच्या पिढीचें त्याकडे दर्लक्ष झाल्यामुळें ते ग्रंथ किडीच्या, वाळवीच्या भक्षस्थानीं पडून नष्ट झाले. आजघडीला 'भारत' ग्रंथावर संस्करण होऊन तयार झालेला 'महाभारत' हा एवढा एकच ग्रंथ उपलब्ध आहे. हें महाभारत बुद्धनिर्वाणानंतर इसवीसनपूर्व ४०० च्या सुमारास तयार झालें आहें. हें हि महाभारताचें दुसरें संस्करण असावे असा माझा स्वताचा तर्क आहे, तो चूकहि असण्याची शक्यता गृहित धरून मी हें माझें मनोगत व्यक्त केलें आहें. आज आपणास उपलब्ध असलेली ७०० श्लोकांची गीता या

महाभारतांत समाविष्ट आहे. गीतेवरील शङ्कराचार्यांचें सर्वात प्राचीन भाष्य, त्यांत ७०० श्लोकांची गीता प्रमाण मानली आहे. आचार्यांचा कार्यकाल इसवी सन ७०० नंतर येतो. महाभारत ग्रंथ तयार झाल्यावर ११०० वर्षांनी (४००+७००) आचार्यांचा कार्यकाल सुरूं होतो. इसवीसनपूर्व ४०० पासून इसवीसनानंतर १९ व्या शतकापर्यन्त म्हणजे २३०० वर्षेंपर्यन्त गीतेच्या ७०० श्लोकांच्या हस्त-लिखितांची परंपरा अविच्छिन्न चालू होती. नंतर मुद्रणकला आल्यावर २० व्या शतकापर्यन्त लाखो ग्रंथ छापून निघाले. पूर्वीच्या काळीं उत्तमोत्तम ग्रंथ नकलून घेऊन ते आपल्या ग्रंथसंग्रहांत ठेवणें ही श्रीमंतांचीच कामें होतीं. उत्तम लेखनिक बसवून आणि त्यांना ग्रन्थांचीं पानें वाटून देऊन ती नकलून घ्यावी लागत. हें मोठे कष्टाचें काम असें. त्यासाठीं

मानधनहि उदारहस्तें द्यावे लागत असें. मुद्रणकला आल्यापासून आपण फार ऐदी झालो. चार ओोळी लिहिणें आपल्या जीवावर येतें. पूर्वीच्या लोकांचें सगळेच जीवन किती कष्टाचें होतें! एवढें कष्ट घेऊन इतकीं वर्षें त्यांनी हा अमूल्य ठेवा प्रत्येक कालखण्डांत जपून ठेवला; त्यांचें हें ऋण कधींतरी फिटेल कां? त्यांच्या या ऋणांतून कधींहि उतराई होता येणार नाहीं. तें सदैव शिरीं धरावें आणि अश्रू ढाळावेत, आणि तें पुसण्याचेंहि कोणांत सामर्थ्य नसावें, अशी स्थिती आहे.

पूर्वीच्या काळीं ग्रंथ नकलून घेण्याचें कार्य महिनोमहिने चालत असें, कष्टहि फार असत आणि द्रव्यहि बरेच खर्च होत असें. त्याकाळीं लेखनाची विशेष अशी कसलीहि सुविधा नव्हती. माझे आजोबा विद्याव्यासंगी होते. कुठून-कुठून चांगले-चांगले ग्रंथ आणीत आणि रोज ४/५ तास बसून ते नकलून घेत असत. त्यावेळीं पानें मोकळी म्हणजे सुटी असत. त्यावर वर आणि खाली

अशा दोन फळ्या असायच्या; नंतर तो ग्रंथ रंगीत जाड कापडांत बांधून ठेवायचा; त्याला बासन म्हणत. आजोबांच्यावेळीं बाजरी जाळायची नंतर ती गोड्यातेलांत खलायची आवश्यक तेव्हढी ती पातळ करायची; मग चिनीमातीच्या एका दौतींत भरून ती शाई म्हणून वापरली जात असे. नंतर बोरू घेऊन तो निफासारखा छिलायचा, शाई उतरण्यासाठीं मध्यें थोडा चिरायचा कीं, झाली लेखणी तयार. दौत-टाक नंतर आले. वडिलांच्यावेळेपासून हे दौत-टाक आले. बाजरीची शाई, बोरू, जाड पिवळसर कागद आणि वात मोठी केलेली गोड्यातेलाची समई. बस्, हे एवढेच लेखन साहित्य. येवढ्या अल्प

साहित्यावर आजोबांनी त्यांच्या आयुष्यांत अनेक ग्रंथ नकलून घेतले होते. आजोबा लिहित असतांना माझ्या बाळपणीं मी बघत बसे. आजोबांचें अक्षर फार वळणदार होतें. किती कष्ट पडत असत त्यावेळीं! हें आतां ध्यानीं येतें. आज आमच्यासारखे ऐदी आणि निकामी लोक, त्या आम्हाला नियतीनें झेरॉक्सचें केव्हढे वरदान दिलें आहें; कष्ट नाही त्यामानाने खर्च नाही. हें असें वरदान पूर्वीच्या लोकांना मिळालें असतें तर त्यांनी त्याचें सोनें केलें असतें. देवाच्या घरचा न्यायहि विचित्रच आहे. रत्नतुल्य असणारे पूर्वीचे लोक, त्यांना लेखनाची विशेष अशी कसलीहि सुविधा नव्हती. याउलट आज आमच्यासारख्या नालायकांना मुद्रणयंत्रें, झेरॉक्स, कॉम्प्युटर, आणि समईच्या मानाने

केव्हढा मोठ्ठा उजेड! जुना काळ आणि आत्ताचा काळ आठवला म्हणजे फार वाईट वाटते. मी नेहमीच रात्रीच्या शांतवेळीं लिहीत बसतो. कधी एकादेवेळीं या जुन्या आठवणी प्रकर्षाने जागृत होतात. काय सांगू? त्यावेळीं मी ओक्साभोक्षी रडत बसतो. ‘‘म्हणूनि अनिवार हें नयनवारि जें वाहतें । असे अहह! शक्त कां कवणहि टिपायास तें।।’’ हे लेख कॉम्प्युटरवर मी स्वता टाईप केले आहेत. कॉम्प्युटर हें कसलें अद्भुत विश्व आहें! देवलोकीचा तो कल्पवृक्ष आहे. केवढ्या कल्पनातींत सुविधा आहेत त्यांत! मला माझ्या वडिलांची आणि आजोबांची आठवण होते. ‘पाळिलें पोशिलें लावियला ळळा’

असा तुम्ही माझा सांभाळ केला. दुःख एवढें मोठें आहें कीं, माझें हें स्वर्गीय वैभव पाहण्यास ते आज हयात नाहीत. गिरीशांचे शब्दांत, ‘‘कष्टले ते बघण्यास आज नाही। वदुनि संयमिले अश्रु तयें कांहीं।।’’

# {९}

संशोधन वेगळें आणि कल्पनेनें लिहिणें वेगळें. कल्पना कोळ्याच्या जाळ्याप्रमाणें सवंग असते तर संशोधन मधाच्या पोळ्याप्रमाणें परिश्रमानें परिपूर्ण होतें. संशोधनाला वास्तवाचा भक्कम आधार असतो तर कल्पना कल्पनाविश्वांतच रममाण होतें. यामुळें ‘‘जो जे मति सापडला तयास तेचि प्राप्त’’ अशी स्थिती प्राप्त होते. याला विद्वत्ता म्हणत नाहीत, व्यासंग म्हणत नाहीत. सर्वसाधारण शिकलेला माणूस चित्तवेधक कल्पना करूं शकतो. त्याचा विद्वत्तेशीं काडीइतकाहि संबंध नसतो. यामुळेंच विद्वद्वरेण्यांच्या समुदायांत त्याला कवडी इतकेहि मूल्य नसतें.

आजच्या गगनवेधी विज्ञान-युगांत विज्ञानासंबंधी अगदी गणितागत पद्धतीनें काटेकोरपणें बोलावे लागतें. तेथें कल्पनेनें बोलणाऱ्याला कानाला धरून हाकलून देतील. याच विज्ञान-युगांत तत्त्वज्ञान, धर्म, समाजशास्त्र या विषयांत हें कल्पना-साम्राज्य मोकाटपणें वाढतें आहें. याचा परिणाम म्हणून रद्दड वाङ्मयाचा सर्वत्र सुळसुळाट झाला आहे.

एकाद्याला एकाद्या विषयासंबंधीं भन्नाट कल्पना येते. लगेच उपटसुंभासारखा तो मध्येंच उठून उभा राहतो. जणूं साक्षात्कार व्हावा अशा थाटांत त्या कल्पनेंतून कोळ्याप्रमाणें नयनरम्य अद्भुत जाळें निर्माण करतो. सामान्यजन त्यामुळें भारावतात, मोहित होतात आणि एक गाढा अभ्यासक व संशोधक म्हणून त्याला पदवीहि बहाल करून टाकतात.

युरोपीय पंडितांच्या अफाट विद्याव्यासंगाला भुलून आपल्याकडील गुलाम मेंदूचा उच्च्य विद्याविभूषित समुदाय, दुसऱ्या भाषेंत 'यह गुलामोंकी लंबी कतार' वाटेलतसला धुडगूस घालून राहिली आहे. याचीं शेकडों उदाहरणें आहेत.

पहिलें उदाहरण जर्मन पंडित डॉ. लॉरिन्सरचें पहा- त्याला डॉक्टरेट ही उपाधी होती. इसवीसन १८६९ सालीं डॉ. लॉरिन्सरनें गीतेचें भाषांतर आणि टीकात्मक विवेचन केलें आहें. त्यांमध्यें त्याने अकलेचे आणि कल्पनेचे तारे कसे तोडले आहेत तें पहा, तो म्हणतो,''ख्रिस्त या नांवावरून कृष्ण ही संज्ञा रूढ झाली. त्याचप्रमाणे 'येशुख्रिस्त' या पूर्ण नांवावरूनच कृष्णाला 'यशोदेचा कृष्ण' हें नांव प्राप्त झालें होतें. त्यानें गीता आणि बायबल यांतील समानार्थक स्थळें शंभराहून अधिक दाखविली आहेत. विशेषत:

बायबलचा नवा करार आणि **(Surman on the mount)** ‘‘येशूची गिरीवरील प्रवचनें’’ यांतून त्याला ती मिळाली आहेत. त्यांतील कित्येक साम्यस्थळें कमालीची विलक्षण आणि अतिशय मनन करण्यासारखी आहेत. कित्येक स्थळें नुसती समानार्थकच नाहींत तर शब्दशः अगदी एकसारखीच आहेत.

त्याच्या संशोधनाचा आणि सादर केलेल्या प्रबंधाचा निष्कर्ष असा कीं, हिंदुस्थानमध्यें स्वतःचें असें कांहींच नाहीं. त्यानें आमच्याकडूनच सर्व उसनवारी केलेली आहे. जणूं आपण निर्वीरमुर्वितलम् केलें असे समजून आणि आतां स्वर्ग दोनच बोटे उरला आहे अशा घमेंडीत तो खुशींत गाजरें खात होता. मात्र या संशोधनानें आपली नाचक्की होईल हे बिच्याऱ्या लॉरिन्सरच्या स्वप्नांतहि आलें नसेल पण प्रत्यक्षांत मात्र तसे घडलें खरें !

ज्या देशांत ख्रिस्त जन्मास आला त्या देशांतील यहुदी धर्म मुळांत कर्मप्रधान होता. त्यांत ख्रिस्तजन्मापूर्वी २०० वर्षें अचानक ‘एसीन’ हा संन्याशांचा पंथ निर्माण झाला. हे संन्यासी मृतसमुद्राच्या पश्चिम किनाऱ्यावर मठ स्थापून राहत होते. आणि आपला काळ शांतपणें ज्ञानसाधनेंत

व्यतीत करीत होते. बायबलच्या नव्या करारांत संन्यास धर्माचें जें वर्णन आहें, उदाहरणार्थ ‘‘सुईच्या नेढ्यातून एकवेळ उंट जाईल मात्र संपत्तीचा संग्रह करणाऱ्या धनवानाला देवाच्या राज्यांत कधीहि प्रवेश मिळणार नाही.’’ या संन्यस्त वृत्तीचें मूळ या एसीन पंथापर्यन्त जातें. हा संन्यासी पंथ यहुदी धर्मांतून क्रमाक्रमानें विकसित झाला असे मुळीच दिसत नाही. याउलट हा अकस्मात् निर्माण झाला, असे म्हणाल तर जगाच्या धर्मेतिहासांत अशी एकहि नोंद नाही. कारण प्रत्येक पंथाचा उगम हा सापडतोच. हिंदुस्थानांत बुद्धनिर्वाणानंतरहि बौद्धधर्म वृद्धिंगत होतच राहिला. त्यांतील शिष्यप्रशिष्यांचा मिळून प्रचंड समुदाय निर्माण झाला. आतां या पंथांत धर्मप्रचाराचा आणि प्रसाराचा विचार मूळ धरूं लागला. नंतर तो पुढे बळावत जाऊन बौद्धभिक्षूंच्या धर्मपरिषदांत वादंग सुरूं झाले आणि याचा अंतीम परिणाम म्हणून या भिक्षूंच्या प्रचंड समुदायांत उघडपणें दोन तट पडले, दोन पंथ निर्माण झाले. एक हीनयान पंथ तर दुसरा महायान पंथ. हीनयान पंथ हें परिपूर्ण, विशुद्ध बौद्ध तत्त्वज्ञान आहें. मात्र दुःखाची गोष्ट अशी कीं, भारतवर्षांत आज त्याचा मागमूसहि नाही. तें पूर्णपणें लोप पावलें आहें. बुद्ध तत्त्वज्ञान आणि त्याची ध्यान पद्धति इतकी अमूर्त (**Abstract**) होती कीं, विशिष्ठ योग्यतेच्या व्यक्तीच बौद्ध पंथाचे अनुयायी होऊं शकतात. पात्र

व्यक्तींच्या अभावी हें तत्त्वज्ञान हवेतच राहण्याचा संभव असल्यामुळें याचे पाय जमिनीला लागणे शक्य नव्हते. याबरोबरच धर्मप्रचाराच्या विचाराचाहि जोरदार पुरस्कार होत होता. याचा मेळ कसा घालणार? सर्वसामान्य माणसामध्यें धर्मप्रचारासाठीं, त्याचा एक कार्यक्रम होण्यास, त्याला एक मूर्तरूप देणें भाग होतें. पण यामुळें विशुद्ध बुद्ध तत्त्वज्ञान अशुद्ध होण्याचा संभव आहे, हाहि तितकाच तुल्यबल विचार होता. मात्र हा धोका पत्करूनहि सर्वसामान्य माणसांत धर्म-प्रचार करण्याचा विचारहि मागे हटत नव्हतां.

अशा परस्पर विरोधी वैचारिक आंदोलनामुळें या बौद्ध भिक्षूंच्या प्रचंड समुदायांत मागे सांगितल्या-प्रमाणे दोन पंथ निर्माण झाले. पहिला महायान पंथ म्हणजे मोठा समुदाय असलेला राजमार्गासारखा पंथ तर दुसरा स्थविरवादी,— असलेली स्थिती न सोडणारा — अगदी कमी लोकांचा पंथ. आतां हा महायान पंथ कशाच्या आधारें बौद्ध धर्माला मूर्त रूप देणार? कारण बुद्ध धर्मांत असा एकहि ग्रंथ नाही. यासाठीं धर्माबाहेरून मदत घेणे भाग होते.

## बुद्धजन्मापूर्वी १ हजार वर्षें भारतान्तर्गत गीता अस्तित्त्वांत होती.

ब्रह्मनिर्वाण हा गीतेचा खास शब्द. बुद्धानें त्यांतून केवळ निर्वाण एवढाच शब्द घेतला, ही बुद्धधर्माची

खरी खासियत आहे. मौज अशी कीं, अशा नकारावर उभा असल्यामुळें बुद्धधर्म पूर्णार्थानें विधायक आहे. बुद्धानंतर एका शतकाचे आंतच महाभारत ग्रंथ तयार झाला. **आज उपलब्ध असलेली गीता इसवीसनपूर्व ४०० पासून अगदी आज असलेल्या स्वरूपांतच अस्तित्वात होती.** सम्राट अशोकाच्या काळांत म्हणजे इ.स.पूर्व २०० वर्षें, निर्माण झालेल्या या महायान पंथाला, बुद्धधर्माला मूर्तरूप देण्यास गीतेशिवाय अन्य पर्यायच नव्हतां कारण तेवढा प्रभावी आणि लोकमान्य ग्रंथ त्यावेळीं हिंदुस्थानांत उपलब्ध नव्हतां. यामुळें कृष्णाचें ऐवजी बुद्धाचें नांव घालून महायान पंथाने गीतेचें अगदी सरळसरळ अनुकरण करून आपले ग्रंथ सिद्ध केले. आजहि हे ग्रंथ उपलब्ध आहेत. सद्धर्मपुंडरीक, मिलिंदप्रश्न, विनयपीटक इत्यादि.

प.अलेक्झांडरच्या स्वारीनंतर सम्राट अशोकाच्या काळांत म्हणजे ख्रिस्तपूर्व २०० वर्षें, महायान पन्थांतील हे यति हजारोंच्या संख्येने बौध्दधर्म प्रचारार्थ हिंदुस्थानांतून चारी दिशांनी बाहेर पडले. चीन, जपान, इंडोनेशिया, सिलोन या बाजूस बरेच समूह गेले. अशोकाची बहीण संघमित्राहि यासाठीं सिलोनमध्यें गेली होती. कांहीं यतींचे समूह इजिप्त, अलेक्झांड्रिया

आणि यहुदी देशांत तसेच ग्रीसपर्यन्त पसरले. तेथें कित्येक वर्षें ते स्थायिक झाले. कांहीं यतींनी परत यायचे, दुसऱ्यांनी तेथें जायचे असे या बौद्ध यतींचें आवागमन ख्रिस्त जन्मानंतरहि अनेक वर्षें चालू होतें असें दिसतें. ख्रिस्तजन्माच्यावेळीं पूर्वेकडील कांहीं ज्ञानी पुरूष जेरूसलेम येथे गेले होते. असा बायबलमध्यें उल्लेख आहे. हे ज्ञानी पुरूष म्हणजे अधिकारी बौद्ध यतीच होते. यानंतरची गोष्ट अशी कीं, वयाच्या १२ वर्षांपासून ३० वर्षांपर्यन्त येशू कोठे गेला होता आणि काय करीत होता याचा बायबलमध्यें अजिबात उल्लेख नाही. वयाच्या ३० वर्षांनंतर अखेरपर्यन्तचा तपशील बायबलमध्यें संपूर्ण आहे. या मधल्या काळांत तो बौद्ध यतींच्या सहवासांत असला पाहिजे. हा १८ वर्षांचा काळ त्याने अभ्यास, चिंतन, मनन आणि ध्यानधारणेंत व्यतीत केला असला पाहिजे. त्यावेळीं बौद्ध यतींचे ग्रंथ, मागे सांगितल्याप्रमाणे सरळसरळ गीताच होती. अशाप्रकारे येशूला संन्यास धर्माची दीक्षा मिळाली आणि बौद्ध यतींच्या ग्रंथामुळें पर्यायाने येशूला गीतेचेच सखोल अध्ययन घडलें. आणि स्वाभाविकपणे गीतेची संपूर्ण छाप बायबलवर पडली. गीतेंतील निष्काम कर्मयोग सेवाकार्याच्या रूपानें बायबलमध्यें परिवर्तित झाला. बायबलमधील एकूण तत्त्वज्ञान संन्यासमार्गीच असल्याचे दिसतें. मात्र गीतेंतील भक्तीची जोड त्याला

मिळाल्यामुळें तें हृदयंगम झालें आहें. आतां ध्यानीं येईल कीं, ‘एसीन’ या संन्यासी पंथाचें मूळहि ख्रिस्तापूर्वी २०० वर्षें बौद्ध यतींचा रहिवास आणि आवागमन हेंच होतें. या सगळ्या संशोधनाचें अतीम फलित म्हणून उसनवारी कोणी कोणाची केली, हें माझ्यामतें आतां वेगळे सांगण्याची आवश्यकताच उरली नाही. याचा परिणाम असा झाला कीं, विद्वद्वरेंण्यांच्या समुदायांत डॉ. लॉरिन्सरला आपले तोंड दाखविणे मुष्किल झालें. त्याने उठविलेली भुतें अखेर त्याच्याच गळ्यांत पडतील हे बिच्याऱ्या लॉरिन्सरच्या स्वप्नांतहि आले नसेल! पण प्रत्यक्षांत मात्र तसे घडले खरे! त्याने आपल्या पायावर आपल्याच हातानें धोंडा पाडून घेतला. यासाठीं पूर्ण संशोधनाअंतीं आपला निष्कर्ष जाहीर करावा. उगीच भलभलत्या कल्पना करून बुद्धीची दिवाळखोरी जाहीर करूं नये आणि आपल्या लाडक्या कल्पना आपल्या मतलबावर अवलंबून असतात हे ओळखण्यास शिकावे. इति लॉरिन्सर पुराणें प्रथमोध्यायः।।

# {१०}

जर्मनींतील डॉ. लॉरिन्सरचें उदाहरण आपण पाहिलें.

आतां आपल्या पुण्यनगरींतील हें उदाहरण पहा— कोलंबिया युनिव्हर्सिटीचे डॉक्टर ऑफ लिटरेचर पुण्याचे ग. श्री. खैर. माणूस तसा चांगला आहे. शैक्षणिक क्षेत्रांत आणि विशेषत: 'पुणे विद्यार्थी गृह' या संस्थेंत त्यांचें कार्य फार तोलामोलाचे असून चिरस्थायी आहे. मात्र एकादे वेळीं एवढा उच्चविद्या-विभूषित माणूसहि कसा वेडेपणा करतो, त्याचें उदाहरण म्हणून नाइलाजाने ग. श्री. खैरांचेच नांव घ्यावे लागेल. खैरांनी कल्पनेच्या वावड्या उडवून एकेकाळीं पुण्यामध्यें स्वत:चा खूप मोठा बोलबाला केला होता. तुमच्या कल्पनेला कांहीं आधार नको का? प्राचीन परंपरेचा तुम्हांस किती परिचय आहे याचा कसलाहि आगापीछा न ठेवतां अगदीच ढिसूळ पायावर त्यांनी आपल्या संशोधनाचा डोलारा उभा केला. त्याचें नांव ''तिरंगी गीता'' त्याला सहाय्यक म्हणून त्यांनी कांहीं पुस्तिका आणि एक मोठे पुस्तकहि लिहिलें, ज्यांत खरोखर कांहीं तथ्य नाहीं. यासंबंधीं तपशीलांतील हकीकत अशी आहे—

डॉ. खैर अनेक वर्षें गीता वाचीत होते. मात्र एकाच गीतेंत यज्ञ, कर्म, भक्ति, ज्ञान आणि ध्यान

यांची खिचडी कशी? ही समस्या त्यांना काहीकेल्या सुटेना. अखेर कोलंबिया युनिव्हर्सिटींत असतांना त्यांच्यावर अमेरिकन बुद्धीचा—जेम्सलेन प्रमाणे—जो पगडा बसला होता, त्याचा सर्वभावें स्वीकार करून आणि या समस्येचे एक घाव दोन तुकडे करून त्यांनी तिचा कायमचा तटकाच तोडला असे म्हटल्यास तें चूक ठरूं नयें. त्याचें असें झालें कीं, गीतेचा अनेक वर्षें व्यासंग केल्यावर एक दिवस त्यांना अचानक साक्षात्कार झाला. आर्किमिडीज प्रमाणे सापडलें सापडलें म्हणत त्यांना हें कोडें सुटलें. प्रात:समयाला अमृतपान करीत असतां हा चमत्कार घडला. या अचाट संशोधनाचें भाग्य एकटे खैर सोडले तर भारत-वर्षांत कोणाच्याच नशिबीं नव्हतें. या संशोधनाचे आपण एकमेव प्रणेते आहोत आणि याचें सगळें श्रेय आपणासच आहें, अशा थाटांत खैर पुण्यांत वावरूं लागले. १८ व्या शतकांत युरोपमध्यें जर्मन पंडित प्रो. 'गार्बे' याने अगदी असेच संशोधन केलें होतें. कदाचित् खैरांनी त्याचें पुस्तक वाचलें नसेल अथवा किती लोक युरोपीय विद्यापीठांतील पुस्तकें वाचतात? अशा बेमुर्वतखोर वृत्तीनें त्यांनी त्यांचें हें संशोधन दडपून दिलें असेल. एवढे मात्र खरें कीं, हें असलें संशोधन या पुण्यनगरींतील आबालवृद्धांनी प्रथमच अनुभविलें. त्यावेळीं पुण्यांत खूप गोंधळ माजला होता. खैरांनी आपलें बहुमोल संशोधन प्रथमत:

लोकांपुढे मांडलें, त्यांत त्यांचें पहिलें पुस्तक म्हणजे " तिरंगी गीता " यांत त्यांनी छपाई करतांना तीन प्रकारची शाई वापरली आहे. हिरवी, निळी आणि लाल. त्यांचे म्हणणें असें कीं, निरनिराळ्या कालखण्डांत एक, दोन नव्हें, तर तीन लेखकांनी आपापल्या विचारांची भर गीतेंत घातली आहे. या तीन लेखकांनी भर घातलेले श्लोक सळमिसळ करून महाभारतकारानें ७०० श्लोक आणि १८ अधायांचें हें चोपडे त्यांत समाविष्ट केलें. हे तीन लेखक कोण? कृष्णद्वैपायन, पराशर आणि बादरायण का? मुळीच नाही. हवेंत गोळ्या मारणें आधुनिक विद्वान लोकांना फार चांगले साधतें. तीन म्हणजे तीन. खैरांच्या प्रगल्भ बुद्धींत अवतरलेले तीन लेखक. त्यांनी एकाच अध्यायांत तीन रंग वापरले आहेत. कित्येक ठिकाणीं एकाच पानांत तीन रंग आहेत. एक श्लोक एका रंगात तर पुढील ४ श्लोक दुसऱ्या रंगात, नंतरचे कांहीं तिसऱ्या रंगात तर शेवटचा एकाद-दुसरा पहिल्या किंवा दुसऱ्या रंगात. तीन रंग तीन लेखकांना वाटून दिलेत. या तीन लेखकापैकीं कोणकोणते श्लोक कोणकोणत्या लेखकाचे आहेत हे खैरांनी छातीठोकपणें सांगितले आहे. केवढा दांडगा हा आत्मविश्वास! हें अघटित कृत्य खैरच करूं जाणे! प्रत्यक्ष वेदव्यासांनीहि असलें बौद्धिक साहस दाखविण्याची हिंमत केली नसती. ती खैरांनी लीलया

करून दाखविली. एक महिन्यापेक्षांहि जास्त काळ पुण्यामध्यें त्यांच्या कृष्णलीलेसारख्या लीला चालू होत्या. यांत एक मौज अशी कीं, कसलाहि तऱ्हेवाईक माणूस असला तरी त्याची तळी उचलून धरणारे त्याला भेटतातच. यानुसार पुण्यांतील बरेच पदवीधारक श्री. खैर यांच्या गोटांत सामील झाले. खैरांचा उत्साह वाढला. आतां त्यांनी जाहीर व्याख्यानें सुरूं केलीं. त्यामुळें आणखीनच कल्लोळ माजला. मी एकदां पुण्यास गेलो असतां ‘न्यू पूना बुक डेपो’ चे सेल्समन मला म्हणाले, ‘‘अहो! तुम्हांस कळलें का? ते खैरांचं झोंबट उभा राहिलंय पुण्यांत! भला गोंधळ माजलाय!’’ शास्त्रीपंडित म्हणायचे, ‘‘खैरासारख्या वेड्यापिरामुळें सामान्य लोक गोंधळले असले तरी आम्हांस कांहींच फरक पडत नाही.’’ मात्र असें त्यांनी दुर्लक्ष केल्यावर लोक पिसाळले. ‘‘खैरां’’ ना देण्यास तुमच्यापाशीं उत्तर नाहीं म्हणून तुम्ही तोंडें लपवतां’’ असें ते आतां उघडपणें म्हणूं लागले. अशी फारच आरडाओरड होऊं लागल्यावर शाङ्करतत्त्वज्ञानाचे भीष्माचार्य असा ज्यांचा महाराष्ट्रभर नांवलौकिक आहे ते पंडित जोगशास्त्री रणांगणांत उतरले आणि ‘‘गाङ्गेय कोपा चढला कसा रे?। ज्या मानिती हाचि कृतान्त सारे।।’’ अशा थाटांत जोगशास्त्री यांनी केसरीमध्यें ओळीने ५/६ भले मोठे लेख लिहिले आणि खैरांचा ‘न भूतो न भविष्यति’ असा समाचार

घेतला. अतिशय कडक शब्दांत, अगदी मुद्देसूद त्यांनी त्यांची बोडन्ती केली आणि त्यांची अक्षरशः भंबेरी उडवली. वाक्यावाक्यागणिक खैरांच्या संशोधनांतील फोलपणा अत्यन्त परखडपणें मांडला. याप्रमाणे ५/६ दिवस हे मोठमोठे लेख केसरींत आले. पहिल्या दिवशीं पुण्यांमध्यें केसरी हातोहात खपला. पुण्यांत ११ वाजले कीं, केसरी मिळतच नसे. शेवटीं केसरीनें या ५/६ लेखांची एक पुस्तिकाच काढली. तिच्या कित्येक हजार प्रती खपल्या.

आतां मात्र खैरांचें मुखबंधन झालें आणि याचा परिणाम म्हणून खैरांची पुण्यांतील जाहीर व्याख्यानें बंद झाली. नंतर ते बंद खोलींत बसून आणि छोट्या पुस्तिका लिहून नुसते टिरटिर करीत राहिले.

आतां तर या गदारोळाचा आणि वादाचा धुराळा पूर्णपणें खालीं बसला आहे. लोक आतां खैरांना आणि त्यांच्या तिरंगी गीतेला विसरूनहि गेले आहेत. आतां ही ‘ तिरंगी गीता ’ ग्रंथालयांच्या कपाटांची शोभा वाढवीत आहे. त्यांच्यावेळीं त्यांची कांहीं लोकांनी तळी उचलून धरूनहि खैरांच्या हयातींत त्यांना एकहि अनुयायी मिळाला नाही. इति श्री. खैर पुराणें द्वितीयोध्यायः।।

# {११}

तिसरें उदाहरण एवढे महत्वाचें नाही; पण कांहीं कारणामुळें तें विचार करावयास लावणारें आहे. राज्य सरकारी खात्यांत उच्चपदस्थ असलेले गॅझेटेड ऑफिसर श्री. कुलकर्णी. उनके दिमागमें एक सनक सवार हो गयी। त्यांनी गीतेवरील ५/२५ पुस्तकें वाचून आपला एक निबंध – स्वत:चेच पैसे घालून, केवढा उत्साह! – " सर्वसंग्राहक गीता " या नांवानें प्रसिद्ध केला. इतपत ठीक आहे. त्यांना जें वाटलें ते त्यांनी प्रामाणिकपणें लिहिलें. माझ्यासारखा चाळून पाहील आणि देईल ठेवून बाजूला. विषय संपला. पण हा विषय येथें संपत नाही म्हणून तर विस्तारानें लिहावे लागत आहे. या निबंधाला प्रस्तावना दिली आहे आचार्यकुलाचे अध्वर्यु 'पंढरपुरेशास्त्री' यांनी, एक पूर्ण पानभर, शिवाय तीहि संस्कृतमध्यें. आहे कीं, नाहीं चमत्कार!

गीतेचा अध्यात्मिक नव्हें तर सामाजिक आशय जास्त महत्वाचा आहे, असा हा जावाईशोध श्री. कुलकर्णी यांनी आपल्या निबंधांत मांडला आहे. या निबंधांत श्री. कुलकर्णी यांची काडीमात्रहि विद्वत्ता दिसत नसून ते एक उच्य पदवीधर आहेत एवढीच गोष्ट प्रकर्षानें जाणवते. अध्यात्म कशाशी खातात

याचा त्यांना कांहींहि पत्ता नाही. यापुढील गंमत अशी कीं, पंढरपुरेशास्त्रींच्या प्रस्तावनेचा आणि निबंधांतील मुख्य आशयाचा कांहींहि संबंध नाही. निव्वळ पोकळ स्तुती केली आहे. श्री कुलकर्णी पैशाने मजबूत असल्यामुळें (दोघेहि देशस्थ ऋग्वेदी त्यामुळें ही कुंडली जुळते) पंढरपुरे शास्त्रींचा खिसा त्यांनी चांगलाच गरम केला असेल. किंवा आपल्या व्यासंगाचें आणि त्याबरोबरच संस्कृत भाषेवरील प्रभुत्वाचें प्रदर्शन करण्याची अनिवार उर्मी पंढरपुरेशास्त्री यांना झाली असेल; या दोन गोष्टीशिवाय या घटनेचा दुसरा कुठलाच अन्वयार्थ लागत नाही. तें पुस्तक आज मजजवळ नाही. ही गोष्ट ३० वर्षांपूर्वींची आहे. त्याचवेळेला तें पुस्तक मी एका वाचनालयाला इतर कांहीं पुस्तकाबरोबर देऊन टाकलें. त्यामुळें संस्कृत प्रस्तावनेचा जेवढा भाग स्मरणांत आहे, तो त्रुटित स्वरूपांत कां होईना मांडतो म्हणजे कांहींशी कल्पना येईल. प्रस्तावना अशी होती—

अयं निबंधः मया अवलोकिता वाचितश्च। एवत् कालपर्यन्तं भिन्नभिन्न आचार्यैः......स वेदानुसारितया व्याख्याताः। तानि तानि विषयानि समभ्यश्च उपरनिर्दिष्ट महोदयैः जीवनविषयं लक्षीकृत्य सर्वेषांपुरतः स्वविचारोपन्यासः कृतः। ग्रंथारंभे 'चिंतां प्रकृति सिध्यर्थां उपोद्घातं प्रचक्षते' इति न्यायानुसारतः

........भिन्नभिन्न आचार्याणां के के वा पूर्वपक्षा: ते ते जिज्ञासुभि: परंपरया अध्येतव्या: भवन्ति। तत्र महान्काल: अपेक्षते। कलिकाले तत् अशक्यप्राय भवति प्रापंचिकानाम्। जीवनार्थ कलहे कोऽवा ग्रंथ: शान्तिदायक: भवति, अल्पेनैव कालेन इति जिज्ञासा जागर्ति वारंवारं प्रापंचिकानां मनसि। सा जिज्ञासा पूर्णा भवेत् संक्षेपत: अनेन उपद्घात वाचनेन सार्थ गीता वाचनेन, इति मे मति:।

इति कथयित्वा विरमति भवदीय:।
गो. न. पंढरपुरेशास्त्री
आचार्य कुल, पुणे.

एकवेळ श्री कुलकर्णी परवडले पण हा माणूस मला माट्या वाटतो. नुसत्या भाषाप्रभुत्वांत काय फतऱ्या आहे? ‘‘बुद्धीचें वैभव अन्य नाहीं दुजें’’ त्याचें हें असें मातेरे आहे.

शास्त्रसुधाकर बापटशास्त्री यांचे भाच्चे, अद्वैत वेदान्तालंकार, जोगशास्त्री आणि आचार्य कुलाचे पंढरपुरेशास्त्री यांचें तरूणपणांतील अध्ययन बापटशास्त्री यांच्याजवळच झालें. अनेक मोठमोठे ग्रंथ लिहून बापटशास्त्री यांची खरी परंपरा जोगशास्त्री यांनीच चालविली. याच जोगशास्त्री यांचेकडे एकदां गेलो असतां पंढरपुरेशास्त्री यांची प्रस्तावना असलेले श्री. कुलकर्णी यांचे ‘सर्वसंग्राहक गीता’ हें पुस्तक मी त्यांना दाखविले आणि एकेकाळचे तुमचे गुरूबंधु

असलेले पंढरपुरे शास्त्री असा उद्योग कसाकाय करूं शकतात म्हणून विचारले. त्यावर त्यांनी तें पुस्तक थोड्यावेळ चाळलें, पंढरपुरेशास्त्रींची प्रस्तावनाहि पाहिली आणि म्हणाले, ‘‘सा जिज्ञासा पूर्णा भवेत्। पूर्ण कसली होईल, वाचणारा खड्ड्यांत जाईल’’ मला फार हसूं आलें. नंतर ते म्हणाले, ‘‘एक काम करा. तळेगांवला जाण्यासाठीं शिवाजीनगरला जाल ना, त्यावेळीं रस्त्यांत पुष्कळ भेळवाले भेटतात त्यांना हें पुस्तक द्या आणि त्या पैशांत चहा प्या. समाधान तरी मिळेल.’’ ते एकच वाक्य बोललें, जो माणूस पैशाकडे, लाभाकडे, अथवा नांवलौकिकाकडे पाहून लिहितो तो विद्वान नव्हें, गावंढळ आहे. नंतर ते म्हणाले,

‘‘ सत्याची कोणाला चाडच राहिली नाही. सत्यासाठीं मृत्तिकाहि भक्षिण्याची तयारी असणारे आपण; हे सर्व आपल्याबरोबरच जाणार आहे. जग यांतील कांहींहि घेणार नाही. पुण्यांतील या अशा नालायकांना मी कंटाळलो आहे.’’

# {१२}

गीता मे परमा विद्या ब्रह्मरूपा न संशयः ।
अर्धमात्राक्षरा नित्या स्वानिर्वाच्यपदात्मिका ।। १ ।।

चिदानन्देन कृष्णेन प्रोक्ता स्वमुखतोऽर्जुन ।
वेदत्रयी परानन्दा तत्त्वार्थज्ञानसंयुता ।। २ ।।

गीता सुगीता कर्तव्या किमन्यैः शास्त्रविस्तरैः।
या स्वयं पद्मनाभस्य मुखपद्मात् विनिःसृतम्।। ३ ।।

वेदोपनिषदो गावो दोग्धा गोपालनन्दनः ।
पार्थो वत्सःसुधिर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत्।। ४ ।।

पार्थाय प्रतिबोधितां भगवता
नारायणेन स्वयं
व्यासेन ग्रथितां पुराण मुनिना
मध्ये महाभारतम् ।
अद्वैतामृतवर्षिणीं भगवतीम्
अष्टादशाध्यायिनीम्
अम्ब त्वां अनुसंदधामि भगवत्
गीते भवद्वेषिणीम् ।। ५ ।।

पाराशर्यवचः सरोजममलं
गीतार्थ गंधोत्कटम्
नानाख्यानककेसरं हरिकथा
सम्बोधना बोधितम् ।
लोके सज्जनषट्पदैरहरहः
पेपीयमानं मुदा
भूयात्भारतपङ्कजं कलिमल—
प्रध्ववि्स नः श्रेयसे ।। ६ ।।

गीतामाहात्म्यांतील कांहीं निवडक श्लोक मी घेतले आहेत. हे श्लोक मूळ महाभारतांमध्यें नाहीत.

ते नंतरच्या काळांतील इतर ग्रन्थांतून घेतले आहेत. त्यांतील माझी ही निवड म्हणजे गीतेकडे पाहण्याची नेमक-दृष्टि आहे. अधोरेखित शब्द महत्वाचे आहेत. अर्थ चटकन् समजण्यासाठीं कांहीं ठिकाणीं संधि-विग्रह केला आहे.

'पाराशर्यवचः' म्हणजे पराशर व्यासांची वाणी. प्रथम कृष्णद्वैपायन व्यास, नंतर पराशर व्यास, त्यानंतर वैशंपायन व्यास अशी ही परंपरा शुक, सुमंतु, पैलपर्यन्त टिकून होती.

## अध्याय पहिला

याच्या विवेचनांत इतर अध्यायांतील बहुविध संदर्भ आले आहेत; तरीहि पहिला अध्याय पूर्ण होईपर्यन्त त्याचें सूत्र कुठेंहि सुटलें नाहीं, हें ध्यानीं घ्यावे.

धर्मक्षेत्रे कुरूक्षेत्रे समवेता युयुत्सवः ।
मामकाः पाण्डवाश्चैव किमकुर्वतसंजय।।१।।

शरिराला क्षेत्र ही संज्ञा गीतेने १३ व्या अध्यायांत दिली आहे. इदं शरीरं कौन्तेय क्षेत्रमित्यभिधीयते । अ० १३ श्लोक १ म्हणजे 'क्षेत्रम् इति अभिधीयते' गीतेने शरिराला क्षेत्र असे म्हटले आहे. मात्र त्याला 'कुरूक्षेत्रा'ची उपमा देण्याची कल्पना गीतेच्या पूर्वीची आहे. त्याला 'देवयजन' आणि 'ब्रह्मसदन' म्हणून गौरविलें आहें. तसेच अनेक युद्धांची भूमि म्हणूनहि तें गाजलेलें आहें. शरिरांत एक सनातन देवासुर संग्राम चालल्याचें वर्णन उपनिषदांत असून तदनुसार गीतेच्या

१६ व्या अध्यायांत दैवी आणि आसुरी संपत्तीची मांडणी केली आहे. कौरव म्हणजे कर्मासक्त, मूढ, राजस-तामस वृत्ति. पाण्डव-पण्डा-प्रज्ञावान् ज्ञान-दृष्टि सात्विक वृत्ति. आसुरीविरूद्ध दैवी अध्याय १६ अथवा राजस-तामस विरूद्ध सात्विक. अध्याय १४. असे या युद्धाचें दुहेरीं स्वरूप आहें.

धृतराष्ट्र — कौरवांचा पिता, राष्ट्रधारणाचा अभिमान बाळगणारा, आंधळा स्थितिस्थापक. याची अध्यात्मिक परिभाषा 'मोह' ही आहे कारण मोह अंध असतो. 'संजय'—धृतराष्ट्राला युद्धाची माहिती देणारा. गीतेचा पहिला प्रवक्ता श्रीकृष्ण आहे. दुसरा प्रवक्ता संजय आहे. हा व्यास कृपेनें दिव्य-दृष्टि-संपन्न आहे. ही योग-सिद्धि आहे. टेलिपथी;— दूरदर्शन आणि दूरश्रवण असलेली अशी ही सिद्धि आहे. संजयाची अध्यात्मिक परिभाषा 'विवेक' ही आहे.

धृतराष्ट्रच अंध आहे असे नाहीं; सारी मानवजातच अंध आहे. यामुळेंच अंध व्यक्तीची संतती कधी डोळस असूं शकत नाही. ती वरून म्हणजे बाह्यांगानें डोळस दिसत असली तरी अन्तर्दृष्टि म्हणजेच विवेक सदैव झोपलेला असतो. याचा परिणाम असा कीं, सगळ्या मानवजातीचा व्यवहार फायदा-तोटा, लाभ-हानी, याच तत्वावर चाललेला असतो.

संजय हें अध्यात्मिक व्यक्तित्त्व नाही. परन्तु संजयाजवळ एक विशेष शक्ति आहे. 'टेलिपथी'— दूरदर्शन आणि दूरश्रवण. प्रत्येकापाशी ही शक्ति आहे. विशिष्ठ विधिद्वारा दीर्घ प्रयत्नानें ती विकसित करतां येतें. कांहीं वेळां अगदी सहजपणें या शक्तीचा प्रत्यय अकस्मात् येतो. मी ११वर्षांचा होतो. माझ्या मुंजीसाठीं मला सोलापूरला जायचे होतें. जेथें जायचे होतें ती माझी चुलत मावशी देगांवकरांच्या वाड्यांत रहात होती. नक्षीदार लाकूडकाम असलेला दोन चौकी आणि दोन मजली खूप मोठा वाडा!

आश्चर्य असे कीं, सोलापूरला जाण्याच्या अगोदर कधीं न पाहिलेला वाडा मला दोन दिवस लख्ख दिसत होता. तेथें गेल्यावर जसा मी पाहिला होता अगदी तसाच्या तसाच होता. मला कमालीचा विस्मय वाटला. असा हा संजय प्रत्येकांमध्यें आहे. अध्यात्माशीं याचा कांहींहि संबंध नाही. या भौतिक शक्ति आहेत.

दृष्टवा तु पाण्डवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा ।
आचार्यमुपसंगम्य राजा वचनमब्रवीत् ।।

अध्याय १, श्लोक २

दुर्योधन—धृतराष्ट्राचा ज्येष्ठ पुत्र. याची अध्यात्मिक परिभाषा ‘दुराग्रह’ ही आहे.

दुर्योधनाचें व्यक्तित्त्व कसे आहे पहा, १६,२ काममाश्रित्य दुष्पूरं दम्भमान मदान्विता:। मोहाद्गृहित्वा असद्ग्राहान् प्रवर्तन्तेऽशुचिव्रता: ।। दुराग्रही व्यक्तीची ही अशी स्थिती असते.

पश्यैतां पाण्डुपुत्राणां आचार्य महतीं चमूम् ।
व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता ।।

अध्याय १,श्लोक ३

तव शिष्येण—ही औपरोधिक उक्ति आहे. धीमता—तुम्हीं शिकवून तयार केलेला.

अध्याय १ श्लोक ४,५,६,७,८

अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि ।
युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ।। १,४।।

धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान् ।
पुरूजित्कुन्तिभोजश्च शैब्यश्च नरपुङ्गवः।। १,५।।
युधामन्युश्च विकान्त उत्तमौजाश्च वीर्यवान् ।
सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ।। १,६।।

अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम ।
नायका ममसैन्यस्य संज्ञार्थंतान्ब्रवीमि ते ।। १,७।।
भवान्भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः ।
अश्वत्थामा विकर्णश्चसौमदत्ति जयद्रथः ।। १,८।।

पांडवी सेना ४, ५, ६ या तीन श्लोकांत वर्णिली आहे; तद्विरूद्ध कौरवसेना ८ व्या एकाच श्लोकांत वर्णिली आहे. याच प्रकारे १६ व्या अध्यायांत दैवी संपदेचे १, २, ३ या तीन श्लोकांत वर्णन केले आहे. आसुरीसाठीं ४ हा एकच श्लोक आहे.

श्लोक ८ चा शेवटचा चरण पहा— सौमदत्तिस्तथैव च गीतेच्या प्रचलित पाठांत जयद्रथाचा उल्लेख नाही. त्याऐवजी 'तथैव च' हे भरतीचे शब्द आले आहेत. पण जयद्रथाचें नांव असलेलाहि एक पाठ उपलब्ध आहे आणि तोच योग्य आहे. कारण अध्याय ११ श्लोक ३४ पहा, द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च। कर्णं तथान्यानपि योधवीरान् । मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठा। युध्यस्व जेतासि रणे सपत्नान् ।।
अर्जुनाच्या शंकानिवृत्तिसाठीं ज्यांच्या ज्यांच्या मृत्यूचें दर्शन घडविले त्यांत जयद्रथ उल्लेखिला आहे इतके ते महत्त्वाचें नांव येथील गणनेंत सुटूं नयें. 'तथैव च' हे भरतीचे शब्द वगळून श्लोक असा होईल—

सौमदत्ति जयद्रथ । अध्याय १ श्लोक ८

अध्याय १ श्लोक ९

अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः ।
नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः ।। १,९।।

'मदर्थे त्यक्तजीविताः' ही साम्राज्यवादाची भाषा अध्यात्मांत बसत नाही.

## अध्याय १ श्लोक १०

अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम् ।
पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम् ।। १० ।।

अपर्याप्त आणि पर्याप्त ह्या दोन शब्दांत सैन्याची शक्ति आणि अशक्ति दोन्हीं सुचविली आहेत. अपर्याप्त म्हणजे संख्याबलाने अधिक ही शक्ति. आणि अपर्याप्त म्हणजे अनावर ही अशक्ति. पर्याप्त म्हणजे मोजके म्हणजे निवडक ही शक्ति आणि पर्याप्त म्हणजे परिमित किंवा अल्प ही अशक्ति.

## अध्याय १ श्लोक ११, १२, १३, १४.

अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिताः ।
भीष्ममेवाभिरक्षन्तु भवन्तः सर्वएव हि ।। १, ११

तस्य संजनयन्हर्षं कुरूवृद्धः पितामहः ।
सिंहनादं विनद्योच्चैः शङ्खं दध्मौ प्रतापवान्
।। १,१२ ।।

ततः शङ्खाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः ।
सहसैवाभ्यहन्यन्तसशब्दस्तुमुलोऽभवत् ।। १,१३

ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यन्दने स्थितौ ।
माधवःपाण्डवाश्चैवदिव्यौशङ्खौप्रदध्मतुः।। १,१४

'न धरी शस्त्र करी मी। गोष्टी सांगेन युक्तिच्या चार' अशी प्रतिज्ञा करून पांडवांच्या मदतीला आलेला माधव शंख फुंकणारांत मात्र पहिला आहे. निष्पक्षपाती माधव अध्याय ९ श्लोक २९ मध्यें पहा— समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेषोस्ति न प्रियः । ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ।। परमेश्वराच्या राग द्वेषरहिततेशीं त्याच्या भक्त वात्सल्याचा विरोध नाहीं. ये यथा मां प्रपद्यन्ते तान्स्तथैव भजाम्यहम् । अ० ४, १२. या न्यायाने तींतून ते सरळच निष्पन्न होणारे आहे. कठोपनिषदांतील रूपकांत आत्मा रथि आणि बुद्धि सारथी आहे. "आत्मानं रथिनं विद्धि शरीरं रथमेव तु बुद्धिस्तु सारथीं विद्धि मनः प्रगहमेव च ।।" गीतेंतील रूपकांत आत्मा रथि आणि परमात्मा सारथी आहे. पहिली भूमिका देखिल गीतेला मान्य आहे. पहा—

दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगात् धनंजय ।
बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः।। अ०२,४९

तसेच इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया ।
विमृश्यैतत् अशेषेण यथेच्छसि तथा कुरू ।। अ०१८,६३.

मात्र दुसरी गीतेची विशिष्ठ भूमिका आहे. पहा—

मय्यासक्तमनाः पार्थ योगयुञ्जन्मदाश्रयः। अ०७,१

सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज। अ० १८,६६.

अध्याय १ श्लोक १५.

पाञ्चजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः ।
पौण्ड्रंदध्मौमहाशङ्खं भीमकर्मावृकोदरः।। १,१५

शंखांच्या नांवांत कांहीं विशेष आहे असें नाहीं. पण भगवंताचा शंख पाञ्चजन्य आणि भक्ताचा देवदत्त ही नांवें सूचक आहेत. भगवन्ताचा आवाज पंचजनांच्या कल्याणेच्छेनें प्रेरित आहे, तर भक्ताचा आवाज देवाच्या प्रसादानें लाभलेली देणगी आहे.

अध्याय १ श्लोक १६, १७, १८, १९.
अनन्तविजयं राजा कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः ।
नकुल:सहदेवश्चसुघोषमणिपुष्पकौ ।। १,१६.

काश्यश्च परमेष्वासः शिखण्डी च महारथः ।
धृष्टद्युम्नोविराटश्चसात्यकिश्चापराजितः।। १,१७.

द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते ।
सौभद्रश्चमहाबाहुःशङ्खान्दध्मुःपृथक्पृथक।। १,१८

स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् ।
नभश्चपृथिवींचैवतुमुलो व्यनुनादयन् ।। १, १९.

आसुरी वृत्तींचा जमाव मोठा असला तरी त्यांना आंतून बळ नसते. बाहेरचा उसना आव आणून त्या शौर्य गाजवीत असतात.

अथ व्यवस्थितान्दृष्टवा धार्तराष्ट्रान्कपिध्वजः।
प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरूद्यम्यपाण्डवः।।
अध्याय १,२०.
अर्जुनाच्या ध्वजावर हनुमन्ताची प्रतिमा या संज्ञेच्या अर्थासाठीं बलंबलवतां चाहं कामराग विवर्जितम्। अ०७,११
आणि याउलट स्थिती पहा—अशास्त्रविहितं घोरं तप्यन्ते ये तपो जनाः । दंभाहंकारसंयुक्ताः कामरागबलान्विताः।। अ०१७,५.

हृशीकेशं तदा वाक्यं इदं आह महीपते ।
अर्जुन उवाच
सेनयोरूभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत।।२१ ।।

यावदेतान्निरीक्षेऽहं योद्धुकामान् अवस्थितान् ।
कैर्मयासह योद्धव्यं अस्मिन्रणसमुद्यमे॥२२॥

योद्धुकामान्—युद्धाची विशेष इच्छा, खुमखुम.

योत्समानां अवेक्षेऽहं य एतेत्र समागताः ।
धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः॥२३॥

अर्जुनाच्या मनाची त्रिविध परिणति—

१ उत्साह श्लोक २२ आणि २३.
२ विषाद श्लोक २८ ते ४६.
३ दैन्यभाव श्लोक २.७

संजय उवाच

एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत ।
सेनयोरूभयोर्मद्धे स्थापयित्वा रथोत्तमम्॥२४॥

भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षिताम् ।
उवाच पार्थ पश्यैतां समवेतां कुरून् इति॥२५॥

गीतेत अर्जुनाला उद्देशून योजलेला 'तूं' हा शब्द थोड्या ठिकाणीं, 'उवाच पार्थ पश्यैतान्समवेतान् कुरून् इति' अ० १ श्लोक २५. असा व्यक्तिवाचक. कांहीं ठिकाणीं 'एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगेत्विमां श्रृणु' २,३९ असा श्रोतृवाचक. आणि पुष्कळ ठिकाणीं

'कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन' २, ४७ असा श्रेयोर्थी साधक या अर्थाचा आहे.

तत्रापश्यत् स्थितान् पार्थःपितृनथ पितामहान् ।
आचार्यान् मातुलान् भ्रातृन् पुत्रान् पौत्रान् सखीं तथा ।।२६ ।।
श्वशुरान् सुहृदश्चैव सेनयोरूभयोरपि ।
तान् समीक्ष्य स कौंतेयःसर्वान् बन्धून् अवस्थितान्।।२७
कृपया परयाविष्टो विषीदन्निदं अब्रवीत् ।

अर्जुनाच्या विषाद-वाक्यांतील मुद्यांचें निरसन करण्याची गरज भगवंतांनी मानली नाहीं. कारण अर्जुनाचें कथन अप्रासंगिक आणि मूळ भूमिकेस सोडून आहे. अध्याय २ श्लोक २. तथापि सदर मुद्यांचें निरसन दुसऱ्या अध्यायांतील विवेचनानें अपेक्षित आहे. दुसरा अध्याय ही थोडक्यांत सबंध गीता आहे. त्या अध्यायांत एतत्संबंधीं खाणाखुणा पाहण्यासारख्या आहेत.

१— सीदन्ति मम गात्राणि १. २९
उत्तरः— न विकम्पितुमर्हसि २. ३१
२— न च श्रेयोऽनुपश्यामि १. ३१
उत्तरः—धर्मात् हि युद्धात् श्रेयोऽन्यत् क्षत्रियस्य न विद्यते
३—स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव १.३७
उत्तरः—सुखिनः क्षत्रियाःपार्थ लभन्ते युद्धमीदृशम् २.३२

४— भवतीत्यनुशुश्रुम १. ४४
उत्तरः—तदा गन्तासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च २.५२

शिवाय अर्जुनाची सर्वसामान्य पाप-दोष-शंका १.३६, ३८, ३९, ४५.
उत्तरः— २.३२, ३८, ५०.

अठरावा अध्याय उपसंहाराचा असल्यामुळें त्यांत हि या शंकेचें निरसन १८.४८ आणि १८.६६ मधें आढळणार आहे.

अर्जुन उवाच

दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम्।।२८।।

सीदन्ति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति ।
वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ।।२९।।

गाण्डीवं स्रंसते हस्तात् त्वक्चैव परिदह्यते ।
न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः।।३०।।

अष्ट तामस भाव— श्लोक २८ ते ३०.
निमित्तनि च पश्यामि विपरीतानि केशव ।
न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे ।।३१।।

अर्जुन हा त्या काळचा अद्वितीय वीर होता. युद्ध म्हटले म्हणजे त्याला स्फुरण चढावें. पण या वेळेच्या युद्धांत उभयपक्षीं स्वजनसमूह आणि शेवटचा प्रसंग असल्यामुळें स्फूर्तीऐवजीं गात्रशैथिल्यादि विपरीत लक्षणें १.२८ ते ३०. अनुभवास आलीं, त्यावरून त्यानें निष्कर्ष काढला— ‘‘न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनं आहवे’’

न काङ्क्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च ।
किं नो राज्येन गोविन्द किं भोगैर्जीवितेनवा।।३२।।

वासना-पंचक—जगावें, जिंकावें, सत्ता चालवावी, भोग भोगावें, सुखी व्हावें.

येषामर्थे काङ्क्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च ।
त इमेऽवस्थिता युद्धेप्राणांस्त्यक्त्वा धनानि च ।।३३।।

आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः ।
मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाःसम्बन्धिनस्तथा।।३४।।

‘‘आजे बाप मुलें नातू’’ आणि आमची पिढी, मिळून पांच पिढ्या.

एतान्न हन्तुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन ।
अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ।।३५।।

साम्राज्य, सत्ता, स्वामित्व जीवनसाधनेंत, राज्यसाधनेंत बसूच शकत नाहीत.

निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन ।
पापमेवाश्रयेत् अस्मान् हत्वैतान् आततायिनः ।।३६।।

तस्मान्नार्हा वयं हन्तुं धार्तराष्ट्रान् स्वबान्धवान् ।
स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव।।३७।।

'कथं सुखिनः स्याम'—(अ) आम्हांला सुख लाभणें कसें शक्य आहे? (आ) आम्हीं सुख भोगणें कसें योग्य होईल?

यद्यप्येते न पश्यन्ति लोभोपहतचेतसः ।
कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ।।३८।।

मैत्री हा मानवता धर्म. म्हणून मित्रद्रोहासारखे पातक नाही. मित्रद्रोह म्हणजे मानवता द्रोह. कुलक्षय ही त्याची च एक ठळक आवृत्ति.

कथं न ज्ञेयम् अस्माभिः पापात् अस्मान् निवर्तितुम्।
कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिः जनार्दन ।।३९।।

अस्मान् पापात्— मानवताद्रोहाचें (मित्रद्रोह आणि कुल-क्षय उभयरूप)

कुलक्षये प्रणश्यन्ति कुलधर्माः सनातनाः ।
धर्मे नष्टे कुलं कृत्स्नं अधर्मोऽभिभवत्युत ।।४०।।

कुल-धर्म—(अ) कुल विषयक कर्तव्य-भावना आणि तदनुसार कर्तव्यें, (आ)कुलांतील विशेष गुण आणि त्यामुळें प्राप्त झालेलीं कर्तव्यें.

अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यन्ति कुलस्त्रियः ।
स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः ।।४१।।

कुल-स्त्रिया—नारी-शक्ति (१०.३४) शास्त्रकार मानवी मूल्यांच्या रक्षणाची विशेष आशा स्त्रियांपासून करतात.

संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च ।
पतन्ति पितरो ह्येषां लुप्तपिण्डोदकक्रियाः।।४२।।

(१) 'पतन्ति पितरो' म्हणजे पितरांची संस्कृति खालीं पडणें, त्यांच्या संस्कृतीची अवनति.

(२) श्राद्ध म्हणजे श्रद्धापूर्वक पितृ-स्मरण, पूर्वजांचें पुण्य-कार्य पुढें चालविण्याची आस्था, तत्सूचक विधि.

दोषैरेतै: कुलघ्नानां वर्णसंकरकारकै: ।
उत्साद्यन्ते जातिधर्मा: कुलधर्माश्चशाश्वता:।।४३।।

कुल-धर्म-नाशाचा परिणाम त्या त्या कुलापुरता सीमित न रहाता तत्संबद्ध समाजाला हि तो व्यापतो. व्यक्तीचे दोष कुलाला, कुलाचे समाजाला, समाजाचे मानवतेला, अशी उत्तरोत्तर दोष-व्याप्ति होत जाते.

उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन ।
नरकेऽनियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ।।४४।।

'इति अनुशुश्रुम' हा उल्लेख लौकिक न मानतां शास्त्रीय मानल्यास ऋग्वेद ४.५,५ चा निर्देश करता येईल. ''भाऊ गमावून बसलेल्या बहिणी आणि पति गमावून बसलेल्या पत्नि ज्या समाजांत बाहुल्यानें नांदतात आणि जिथें पापी पापाचरण करून तें लपवूं पाहतात त्या समाजासाठीं नरक निर्मिला आहे.'' असा त्या वेद-वचनाचा भावार्थ आहे.

अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम् ।
यद्राज्यसुखलोभेन हन्तुं स्वजनमुद्यताः ।।४५।।

ह्यांत तीन विचारदोष आहेतः—

(१) मी मारणारा — आत्म्याविषयीं अज्ञान,

(२) स्वजनमोह— स्वधर्मनिष्ठेची उणीव,

(३) सुखासाठीं राज्य— कर्मयोगाविषयीं चुकीची कल्पना.

त्यांच्या निरसनासाठींः—

(१) सांख्यबुद्धि (२.११ ते ३०)

(२) तदंतर्गत स्वधर्मनिष्ठा (२.३१ ते ३८)

(३) योगबुद्धि (२.३९ ते ५३)

अशीं तीन अधिकरणें दुसऱ्या अध्यायांत आलीं आहेत.

यदि मां अप्रतीकारम् अशस्त्रं शस्त्रपाणयः ।
धार्तराष्ट्रा रणे हन्युः तन्मे क्षेमतरं भवेत्।।४६।।

स्वजनासक्तीमुळें उद्भवलेली ही एक अशोभनीय दुबळी वृत्ति आहे, असें भगवान पुढें सांगणार आहेत (२.२,३)
जें अर्जुन मान्य हि करणार आहे (२.७)

संजय उवाच

एवमुक्त्वार्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत् ।
विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः ।।४७।।

'रथोपस्थ उपाविशत्'— कारण

(अ) 'न च शक्नोम्यवस्थातुं' (गलितधैर्य)
(आ) 'भ्रमतीव च मे मनः' (किंकर्तव्यमूढ) १.३०

## अध्याय दुसरा

संजय उवाच

तं तथा कृपयाविष्टं अश्रुपूर्णाकुलेक्षणम् ।
विषीदन्तमिदं वाक्यं उवाच मधुसूदनः।।१।।

(१) कृपयाविष्टम् म्हणजे स्वजनासक्तिजन्य दीनतेनें ग्रासलेला (२.७)
(२) अकुलेक्षणम्—पापकल्पनेनें भ्यालेला.

कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम् ।
अनार्यजुष्टं अस्वर्ग्यं अकीर्तिकरं अर्जुन।।२।।

'इदं कश्मलं विषमे'— भलत्या वेळीं भलती गोष्ट हेच पाप.
अकीर्तिकरम्—जगाचें नुकसान.
अस्वर्ग्यम्—आत्म्याचें नुकसान.

क्लैब्यं मा स्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते ।
क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ।।३।।

वीरवृत्ति पारमार्थिक साधनेची अंत:शक्ति आहे. संन्यास, अहिंसा इत्यादि कोणतीहि उत्तम साधनें दुबळेपणानें आचरलेलीं परमार्थाच्या उपयोगाची नाहीत.

अर्जुन उवाच

कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन ।
इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन।।४।।

कृष्णाने दिलेला ठपका ऐकून अर्जुन येथें नवीन तर्क उपस्थित करीत आहे. पूज्य-पूजा-व्यतिक्रमानें श्रेयोहानी होते हा विचार सर्वमान्य च आहे.

गुरूनहत्वा हि महानुभावान्
श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके ।
हत्वार्थकामांस्तु गुरूनिहैव
भुंजीय भोगान्रूधिरप्रदिग्धान्।।५।।

हें वैतागून बोलणें समजावयास हवे आहे. येथें लगेच अर्जुनाच्या गळ्यांत संन्यासाचें लेबल कशाला अडकवायचें?

अर्थकामान्— हा शब्द विनाकारण घोटाळ्याचा झाला आहे. ‘‘वासुदेवस्तु उभयो: अर्थकाम:’’ म्हणजे वासुदेव दोन्ही पक्षाचे हित इच्छिणारा आहे—या महाभारतांतील वचनानुसार येथें अर्थ-निर्णय केला आहे.

न चैतद्विद्म: कतरन्नो गरीयो
यद्वा जयेम यदि वा नो जयेयु: ।
यानेव हत्वा न जिजीविषाम:
स्तेऽवस्थिता: प्रमुखे धार्तराष्ट्रा: ।।६।।

युद्धांत कुणाचा जय होईल हा प्रश्न नेहमीच संशयांत असतो. पण त्या ऐवजी युद्धांत कुणाचा जय होणें इष्ट असा नैतिक प्रश्न अर्जुनानें मांडला आहे.

कार्पण्यदोषोपहतस्वभावः
पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः ।
यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे
शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम्।।७।।

''शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम्''— दुसऱ्या अध्यायांतील हें पहिलें अधिकरण (२. १ ते १०) पूर्व अध्यायांतील आख्यायिकेचा च शेष असल्यामुळें पहिल्या अध्यायाला जोडतां आलें असतें. पण अर्जुनाची गुरू-शरणता ज्ञान-कथनाला सन्निहित असल्यामुळें हें अधिकरण दुसऱ्या अध्यायांत घातलें आहे. शिवाय भगवतांचें बोधपर आदिवचन हि (२.२,३) या अधिकरणांत असल्यामुळें पहिल्या अध्यायाहून पृथक् विभाग योग्य च आहे.

न हि प्रपश्यामि ममापनुद्याद्
यच्छोकमुच्छोषणमिन्द्रियाणाम् ।
अवाप्य भूमौ असपत्नमृद्धं
राज्यं सुराणामपि चाधिपत्यम् ।।८।।

संजय उवाच

एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परंतप ।
न योत्स्य इति गोविन्दं उक्त्वा तुष्णीं बभूव ह ।।९।।

तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत ।
सेनयोरूभयोर्मध्ये विषीदन्तमिदं वचः ।। १० ।।

कृष्णाच्या हंसण्यांत—

(अ) मोह निरसनाविषयीं आत्मविश्वास.

(आ) कारूण्यभाव

(इ) सख्य-प्रीतीचा विनोद

अशा तीन छटा मिश्रित आहेत.

येथें पहिला अध्याय आणि पहिल्या अध्यायाचें च दुसऱ्या अध्यायांत शिरलेलें १० श्लोकाचें आखात पूर्ण झालें.

# {१३}

अशोच्यान् अन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे ।
गतासून् अगतासूंश्च नानुशोचन्ति पण्डिता:।। ११ ।।

करिसी भलता शोक । वरी ज्ञान हि सांगसी ।
मेल्याजित्याविषीं शोक । ज्ञानवंत न जाणती ।। ११ ।।

श्लोक ११ ते ३८ हे सांख्यबुद्धीचे श्लोक आहेत. आधी पांच श्लोकांत— श्लोक ११ ते १५ — सारा विषय सूत्ररूपानें थोडक्यांत मांडला आहे. तो च पुढें श्लोक १६ते३८ पर्यन्त विवरला आहे.

१ तत्त्वाचें ज्याला ज्ञान आहे, अशा ज्ञात्याची दृष्टि.
श्लोक ११ अशोच्यान्......
याचें विवरण— नासतो विद्यते भावो......श्लोक १६
अविनाशि तु तद्विद्धि..... १७ अन्तवन्त इमे देहा:.......१८

गतासून् अगतासूंश्च नानुशोचन्ति पण्डिता: १ आत्म्याच्या अमर-त्वामुळें २. १९,२०,२१. २धर्मयुद्धांत उभयपरी लाभ असल्यामुळें २.३७ ३ कर्मयोग्याच्या अनासक्तीमुळें २. ५७ य: सर्वत्र अनभि...

न त्वेवाहं जातु नासं न त्वं नेमे जनाधिपा: ।
न चैव न भविष्याम: सर्वे वयमत: परम् ।। १२ ।।

मी तूं आणिक हे राजे । न मागे नव्हतों कधीं ।
तसें चि सगळे आम्ही । न पुढें हि नसूं कधीं।।१२।।

कारण 'असणें' सर्वदा अभंग आहे—श्लोक १६—नासतो विद्यते भावो...... आणि 'होणें' हि मुक्ति लाभेपर्यन्त अखंडच आहे. श्लोक २२—वासांसि जीर्णानि.......

२ तिन्ही पुरूष तिन्ही कालीं विद्यमान श्लोक १२ न त्वेवाहं...... याचें विवरण— श्लोक— १९,२०,२१. य एनं वेत्ति हन्तारं.......... न जायते म्रियते....... वेदाविनाशिनं नित्यं........

देहिनोऽस्मिन् यथा देहे कौमारं यौवनं जरा ।
तथा देहान्तरप्राप्तिः धीरस्तत्र न मुह्यति ।। १३।।

ह्या देहीं बाल्य तारूण्य । जरा वा लाभते जशी ।
तसा लाभे नवा देह ।न डगे धीर तो तिथें।। १३।।

धीर— धीमान्, बुद्धिमान्— मरण म्हणजे नव-जीवन हें जाणणारा.

३ मरण म्हणजे देहान्तरप्राप्ति श्लोक १३देहिनोऽस्मिन्......... याचें विवरण— श्लोक २२,२३,२४,२५ वासांसि जीर्णानि......... नैनं छिन्दन्ति शस्त्राणि....... अच्छेद्योऽयं........ अव्यक्तोऽयं..........

मात्रास्पर्शास्तु कौंतेय शीतोष्णसुखदुःखदाः ।
आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत ।। १४।।

शीतोष्ण विषय-स्पर्श । सुख-दु:खांत घालिती ।
करीं सहन तूं सारे । येती जाती अनित्य ते।। १४।।
शीतोष्ण म्हणजे— लक्षणेने— अनुकूल आणि प्रतिकूल.

दु:खाप्रमाणें सुख हि सहन करावयाचें आहे. सुख-प्राप्ति आणि दु:ख-परिहार हें जीवनाचें उद्दिष्ट नाहीं. जीवनाचें उद्दिष्ट पुढील श्लोकांत. —

४ द्वंद्वे आगमापायी, श्लोक १४ मात्रास्पर्शास्तु कौंतेय.....
याचें विवरण— श्लोक २६,२७,२८. अथ चैनं नित्यजातं......
जातस्य हि ध्रुवो मृत्यु: ....... अव्यक्तादीनि भूतानि.......

यं हि न व्यथयन्त्येते पुरूषं पुरूषर्षभ ।
समदु:खसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते ।। १५।।

ह्यांची मात्रा न चाले चि । ज्या धीर पुरूषावरी ।
सम देखे सुखें दु:खें। मोक्ष-लाभास योग्य तो।। १५।।

धीर— धृतिमान्, तितिक्षायुक्त. याशिवाय श्लोक १३ मधील अर्थहि येथें अपेक्षित आहे. ''समदु:खसुखं''— द्वंद्वमोह निर्मुक्त.
सोऽमृतत्वाय कल्पते । भक्ति आदि मोक्षसाधनेचा अधिकारी होतो.
येषां त्वन्तगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम् । ते द्वंद्वमोहनिर्मुक्ता भजन्ते मां दृढव्रता: ।। ७. २८

५ धैर्यानें कर्तव्य करून सुख-दु:खें समान लेखणें. श्लोक १५
यं हि न व्यथयन्त्येते....... समदु:खसुखं धीरं........
याचें विवरण—श्लोक ३१ ते ३८ स्वधर्मम् अपि चावेक्ष न विकम्पितुमर्हसि । .....सुखदु:खे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ।

नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ।
उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः ।। १६ ।।

नसे मिथ्यास अस्तित्व । नसे सत्यास नाश हि ।
निवाडा देखिला संतीं । ह्या दोहींचा अशापरी।। १६ ।।

मिथ्या वस्तु इंद्रियांना भासमान झाली तरी तिला अस्तित्व नाहीं. उलट सत्य वस्तु दिसेनाशी झाली तरी तिचें अस्तित्व नाहीसें होत नाहीं, असा तत्त्वदर्शी पुरूषांचा निवाडा विवरला आहे, ज्याचें सूचन श्लोक ११ मधें केलें होतें. अशोच्यान् अन्वशोचस्त्वं.......

अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ।
विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हति ।। १७ ।।

ज्यानें हें व्यापिलें सर्व । तें जाण अविनाश तूं ।
नाश त्या नित्य-तत्त्वाचा । कोणी हि न करूं शके ।।

येन सर्वमिदं ततम् । –व्यापणें– अंतर्बाह्य भरून काढणें, कारणत्वानें, निमित्त कारण आणि प्रकृतित्वानें, उपादान कारण. पहा– मया ततमिदं सर्वम् जगदव्यक्तमूर्तिना । मत्स्थानि सर्व भूतानि न चाहं तेष्ववस्थितः ।। ९.४ अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन । विष्टभ्याहमिदं कृत्स्नं एकांशेन स्थितो जगत्।। १०.४२
मागच्या १६व्या श्लोकांत अविनाशित्वाला सत्यत्व हा हेतु दिला होता. येथें व्यापकत्व हा दुसरा हेतु दिला आहे. आत्मत्व हा हेतु स्वयंसिद्ध च आहे.

अन्तवन्त इमे देहा नित्यस्योक्ता: शरीरिण: ।
अनाशिनोऽप्रमेयस्य तस्मात् युध्यस्व भारत ।। १८।

विनाशी देह हे सारे । बोलिले त्यांत शाश्वत ।
नित्य नि:सीम तो आत्मा। अर्जुना झुंज ह्यास्तव।। १८

युध्यस्व— २.१८. मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा ।
निराशीर्निर्ममो भूत्वा युध्यस्व विगतज्वर: ।। ३.३०।।
तस्मात् सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च ।
मय्यर्पितमनोबुद्धि: मामेवैष्यस्यसंशयम् ।। ८.७।।
द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च
कर्णं तथान्यानपि योधवीरान् ।
मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठा
युध्यस्व जेतासि रणे सपत्नान् ।। ११.३४।।
यदहंकारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे ।
मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति ।। १८.५९।।

य एनं वेत्ति हन्तारं यश्चैनं मन्यते हतम् ।
उभौ तौ न विजानीतो नायं हन्ति न हन्यते ।। १९।।

जो म्हणे मारितो आत्मा । आणि जो मरतो म्हणे ।
दोघे न जाणती कांहीं । न मारी न मरे चि हा।। १९।।

हा आणि पुढला श्लोक कठोपनिषदांतून घेतले आहेत. कठोपनिषदांत युद्धाचा संदर्भ नाही. आत्म्याचें कर्म-संपर्करहित स्वरूप दाखविणें एवढें च तेथें तात्पर्य आहें. गीतेंत युद्धाची आख्यायिका आली असली तरी तींत गुंतून हें मूल तात्पर्य नजरेआड होऊं देऊं नये.

न जायते म्रियते वा कदाचित्
नायं भूत्वाभविता वा न भूयः ।
अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो
न हन्यते हन्यमाने शरीरे ।। २०।।

न जन्म पावे न कदापि मृत्यु ।
होऊनि मागें न पुढें न होय ।
आला न गेला स्थिर हा पुराण ।
मारोत देहास परी मरे ना ।। २०।।

दैवी संपत्तीचा अग्रेसर गुण 'अभय' १६.१ प्रस्तुत श्लोकांत विवरलेली आत्म-निष्ठा हें त्याचें वज्र-कवच आहे.

वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम् ।
कथं स पुरूषः पार्थ कं घातयति हन्ति कम्।।२१।।

निर्वीकार चि हा नित्य । जन्म-मृत्यूंहुनी पर ।
जाणे हें तत्त्व तो कैसा। मारी वा मारवी कुणा।।२१।।

जन्म मृत्यु हीं दोन टोकें, आणि मध्यंतरीं बाल्य तारूण्य जरा श्लोक १३— देहिनोऽस्मिन् यथा देहे कौमारं यौवनं जरा— मिळून जीवनाचें पंचांकी नाटक देहाच्या रंगभूमीवर चालत असते. आत्म्याचा त्याच्याशीं— साक्षित्वाव्यतिरिक्त— साक्षित्व हें कर्म नव्हें ती दशाच देखणी आहे, तिचें तें स्वरूप आहें— कांहीं च संबंध नाहीं. हें ज्यानें ओळखले तो कोणत्या हि स्थूल अथवा सूक्ष्म क्रियेचें कर्तृत्व कर्मत्व वा प्रेरकत्व आपल्यावर घेऊं शकत नाहीं. श्लोक १९ ते २१.

वासांसि जीर्णानि यथा विहाय
नवानि गृण्हाति नरोऽपराणि ।
तथा शरीराणि विहाय जीर्णानि
अन्यानि संयाति नवानि देही ।। २२।।

सांडूनियां जर्जर जीर्ण वस्त्रें ।
मनुष्य घेतो दुसरीं नवीन ।
तशीं चि टाकूनि जुनीं शरीरें ।
आत्मा हि घेतो दुसरीं निराळीं ।। २२।।

देहाला येथें वस्त्राची, तशी अन्यत्र वसतिस्थानाची उपमा दिलेली आहे. सर्वकर्माणि मनसा संन्यस्यास्ते सुखं वशी। नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन् ।। ५.१३।। तात्पर्य दोहींचें एकच आहे. एकीकडे तें 'कं घातयति हन्ति कम्' या शब्दांनी मांडलें आहे. श्लोक २१ दुसरीकडे 'नैव कुर्वन् न कारयन्' या शब्दांनीं विवरलें आहे. ५.१३

आत्म्याची देहधारणादि प्रक्रिया— अ० १५. ७,८,९. ममैवांशो जीवलोके...... शरीरं यदवाप्नोति...... श्रोत्रं चक्षु: स्पर्शनं च......

नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावक: ।
न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारूत:।।२३।।

शस्त्रें न चिरिती ह्यास । ह्यास अग्नि न जाळितो ।
पाणी न भिजवी ह्यास । ह्यास वारा न वाळवी।।२३।।
आकाशवत् निर्लिप्त—यथा सर्वगतं सौक्ष्म्यात् आकाशं नोपलिप्यते। सर्वत्रावस्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते।। १३.३२

अच्छेद्योऽयं अदाह्योयं अक्लेद्योऽशोष्य एव च ।
नित्यः सर्वगतः स्थाणुः अचलोऽयं सनातनः ।।२४।।

चिरवे जाळवे ना हा । भिजवे वाळवे हि ना ।
स्थिर निश्चळ हा नित्य । सर्व-व्यापी सनातन।।२४।।

सर्वगतः + सनातनः = दिक्कालंतीत.

अव्यक्तोऽयं अचिंत्योऽयं अविकार्योऽयमुच्यते ।
तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि ।। २५।।

न देखूं ये न चिंतूं ये । बोलिला निर्विकार हा ।
जाणूनि ह्यापरी आत्मा । शोक योग्य नसे तुज।।२५।।

आत्मा इंद्रिय-प्रत्यक्षाचा विषय नाही, हें 'अव्यक्तोऽयं' या शब्दांनीं दर्शविले. तो अनुमानाचा हि विषय नाही,हें'अचिंत्योऽयं' या शब्दांनीं दर्शविले. अर्थात् अनुभवी पुरूषांचा शब्द हा च एक आधार उरला तो च 'अविकार्योऽयं उच्यते' या शब्दांनीं दर्शविला आहे.

अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम् ।
तथापि त्वं महाबाहो नैवं शोचितुमर्हसि ।।२६।।

अथवा पाहसी तूं हा । मरे जन्मे प्रति-क्षणीं ।
तरी तुज कुठें येथें । नसे शोकास कारण ।।२६।।

आत्म्याकडे निर्गुण दृष्टीनें पाहिल्यास तो जन्मत नाहीं आणि मरत नाहीं. पण सगुण दृष्टीनें पाहिल्यास तो प्रत्येक क्षणीं जन्मतो आणि प्रत्येक क्षणीं मरतो असें म्हणतां येतें. ही प्रवाह-नित्यता लक्षांत घेऊन येथें दुसरा पक्ष मांडला आहे. आत्म्याकडे पाहण्याची ही मुख्य दृष्टि नाही. तथापि ही हि एक तत्त्वज्ञानात्मक दृष्टि आहे. हा केवळ जडवाद नव्हें. कोणी हि जडवादी श्लोक २७ मधें सांगितल्याप्रमाणें 'धृवं जन्म मृतस्य च' असें मानीत नसतो. ''मेला म्हणजे मेला च. पुढें जन्म कुठला?'' हा जडवाद. जडवादाला मृत्यूच्या शोकाचें कारण आहे च.

जातस्य हि ध्रुवो मृत्युः ध्रुवं जन्म मृतस्य च ।
तस्मात् अपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ।।२७।।

जन्मतां निश्चयें मृत्यु । मरतां जन्म निश्चयें ।
म्हणूनि न टळे त्याचा। व्यर्थ शोक करूं नको।।२७।।

आत्म्याच्या कूटस्थ-नित्यतेंत जन्म-मृत्यु लागू च होत नाहींत, परिणामी-नित्यतेंत ते आवश्यक ठरतात. उभयपक्षीं शोकाचें प्रयोजन राहत नाहीं.

अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत ।
अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ।।२८।।

भूतांचें मूळ अव्यक्तीं । मध्य तो व्यक्त भासतो ।
पुन्हां शेंवट अव्यक्तीं । त्यामधें शोक कायसा।।२८।।

दोन्ही टोकांना अनंत अपार अव्यक्त पसरलेलें असतांना मध्यंतरीं जो व्यक्ताभास होतो तो त्या अव्यक्त सागराचा एक लहानसा तरंग आहे. त्याला तद्व्यतिरिक्त स्वतंत्र अस्तित्व नाहीं.

आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनम्
आश्चर्यवद्वदति तथैव चान्यः ।
आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति
श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् ॥ २९॥

आश्चर्य जो साच चि ह्यास देखे ।
आश्चर्य जो देखत ह्यास वर्णी ।
आश्चर्य जो वर्णन ते हि ऐके ।
ऐके तरी शून्य चि जाणण्याचें ॥ २९॥

देहांत असतांना देहाचा पडदा दूर सारून आत्म-साक्षात्कार संपादन करणें हें एक आश्चर्य आहे. आत्म-साक्षात्कारानंतर वाणी खुंटते, पण ती संभाळून आत्मानुभवाच्या अवस्थेंत आत्म्याचें वर्णन करूं शकणें हें दुसरें आश्चर्य. असें कोणी आत्म-वर्णन करणारा साक्षात्कारी भेटला तर त्याच्या श्रवणाविषयीं गोडी वाटणारा सहृदय श्रोता भेटणें हें तिसरें आश्चर्य. अशा श्रोत्यांत हि श्रवणाबरोबर चित्ताचे मळ झडून साक्षात्काराचा ठसा चित्तांत उमटणारा असा श्रोता हें चौथें आश्चर्य. अशीं हीं उत्तरोत्तर चार आश्चर्यें आहेत. मनुष्याणां सहस्रेषु कश्चित् यतति सिद्धये । यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ॥ ७.३॥ मोक्षार्थ यशस्वी प्रयत्न करणारांची संख्या कमी असली तरी आश्वासन वाटण्याइतकी पुरेशी आहे. बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः॥४.१०॥ आत्म्याचा साक्षात्कार, वर्णन, श्रवण, अर्थावबोधन, चारी वस्तु दुर्मिळ आहेत. आत्म-ज्ञानाचा महिमा सांगून त्याकडे प्रवृत्त करण्यासाठीं हें वाक्य आहें, त्यापासून परावृत्त करण्यासाठीं नाहीं, एवढे लक्षांत ठेवणें जरूर आहे.

देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत ।
तस्मात्सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि।।३०।।

वसे देहांत सर्वांच्या । आत्मा अमर नित्य हा ।
म्हणूनि भूत-मात्रीं तूं । नको शोक करूं कधीं।।३०।।

आत्म्याचें अमरत्व हें या अधिकरणाचें—श्लोक ११ते३०—प्रासंगिक सार आहें, निर्विकारत्व हें शाश्वत सार आहें. श्लोक २१, २५.
वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम् । अव्यक्तोऽयं अचिन्त्योऽयं अविकार्योऽयमुच्यते ।

स्वधर्मं अपि चावेक्ष्य न विकम्पितुमर्हसि ।
धर्मात् हि युद्धात् श्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते।।३१।।

स्वधर्म तो हि पाहूनि । न योग्य डगणें तुज ।
धर्म-युद्धाहुनी कांहीं । क्षत्रियास नसे भलें।। ३१।।

क्षत्रिय— चातुर्वर्ण्यांतील द्वितीय वर्ण ; व्यापक अर्थानें आर्तत्राणाची जबाबदारी ओळखणारा कर्तव्यपरायण निर्भय स्वयंसैनिक.

येथील क्षत्रिय शब्द उपलक्षणात्मक आहे, म्हणजे सर्वांचाच त्यांत समावेश आहे. आपापल्या कर्तव्य-क्षेत्रांत युद्धप्रसंग सर्वांनाच येत असतो. किंबहुना स्वधर्माचरण हा नित्याचा युद्धप्रसंग च आहे. श्लोक ८.७ तस्मात् सर्वेषु कालेषु मां अनुस्मर युध्य च ।

गीतेनें ज्ञानमार्गाचें विवेचन करतांना त्याला जोडून स्वधर्माचरणाचें विवेचन केले आणि त्यानंतर ज्ञानमार्गाचा उपसंहार केला. अगोदर कां केला नाही? त्याला जोडून स्वधर्माचें विवेचन कां केले?

स्वरूप आणि स्वधर्म—स्वरूप जसजसे ज्ञात होत जाते तसतसा स्वधर्म प्रकट होत जातो. अनेन स्वधर्मो विवृत:। अथवा निष्काम कर्माचरणानें जसजसा स्वधर्म प्रकट होत जातो तसतसे स्वरूप ज्ञात होऊं लागतें. तत्स्वयं योगसंसिद्ध: कालेनात्मनि विन्दति ४. ३८ स्वरूपीं राहणें हा स्वधर्म. अथवा कर्म तेंचि ब्रह्म। ऐसे बोधा आले वर्म।। तेथ प्रकृति आपणपया। वेगळी नुरे धनंजया। रूपेंविण कां छाया। जयापरी।। आतां ध्यानीं येईल कीं, गीतेची यासंबंधीं काय दृष्टि आहे ती समजून घेणे फार जरूरीचें आहें.

यं हि न व्यथयन्त्येते.......समदु:खसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते।। २.१५ आतां स्वधर्माचरणाचें विवेचन केल्यावर गीता काय म्हणते पहा—सुखदु:खे समे कृत्वा............नैवं पापमवाप्स्यसि।। २.३८ म्हणजे तुझी चित्तशुद्धी होऊन तूं अमृतत्वाय कल्पते मोक्षाचा अधिकारी होशील. गीता योगमार्गावरील ग्रंथ आहे, सांख्यमार्गावरील नाही. यामुळें ज्ञानमार्गाशीं स्वधर्माचरण जोडूनच ती त्याचें विवेचन करणार हें उघड आहें.

## यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम् ।
## सुखिन: क्षत्रिया: पार्थ लभन्ते युद्धमीदृशम् ।।३२।।

## प्राप्त झालें अनायासें । स्वर्गाचें द्वार मोकळें ।
## क्षत्रियास महा-भाग्यें । लाभतें युद्ध हें असें ।।३२।।

‘स्वर्गाचें द्वार’ म्हणजे आत्मबलिदानाचा प्रसंग. असा प्रसंग माणसानें आणायचा नसतो तो अनायास यावा लागतो. तो आला असतां टाळूं नये. त्याचें सहर्ष स्वागत व्हावें.

अथ चेत्त्वमिमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि ।
ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापं अवाप्स्यसि ।। ३३ ।।

हें धर्म-युद्ध टाळूनि । पापांत पडशील तूं ।
स्वधर्मासह कीर्तीस । दूर सारूनियां स्वयें ।।३३ ।।

पापं अवाप्स्यसि कशामुळें? तर स्वधर्माचा त्याग केल्यास. २.३३
पापं अवाप्स्यसि कशामुळें? तर सुख-दुःख समान न केल्यामुळें २.३८ म्हणून तर्कशास्त्रीय नियमानुसार स्वधर्म-त्याग आणि सुख-दुःख-भिन्नता हे एकमेकांचे पर्याय झाले. त्या दोघांना 'पापं अवाप्स्यसि' हा एकच मापदंड असल्यामुळें ती दोन्ही एकमेकांची कार्य-कारणें झाली आहेत. स्वधर्माचा त्याग कां होतो? तर सुख हवे, दुःख नको ही लालसा सुखदुःखांना समान करूंच देत नाही म्हणून. या उलट सुखें दुःखें समान कां केली जात नाहीत? तर स्वधर्माविषयीं अरूची आणि परधर्माचें आकर्षण हें आहें. दुसरी गोष्ट अशी कीं, कीर्ति कधी एकटी जात नाही, स्वधर्माला घेऊनच जाते. दुसऱ्या शब्दांत स्वधर्म त्याग केल्यामुळेंच कीर्ति जाते. जो स्वधर्मरत आहे त्याच्या कीर्ति जाण्याचा प्रश्नच येत नाही. जाईलच कशी?

अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यन्ति तेऽव्ययाम् ।
संभावितस्य चाकीर्तिर्मरणाद् अतिरिच्यते ।। ३४ ।।

भयात् रणात् उपरतं मंस्यन्ते त्वां महारथाः ।
येषां च त्वं बहुमतो भूत्वा यास्यसि लाघवम्।।३५।।

अवाच्यवादांश्च बहून् वदिष्यन्ति तवाहिताः ।
निन्दन्तस्तव सामर्थ्यं ततो दुःखतरं नु किम् ।।३६।।

अखंड लोक गातील । दुष्कीर्ति जगतीं तुझी ।
मानवंतास दुष्कीर्ति मरणाहूनि आगळी ।। ३४।।

भिऊनि टाळिलें युद्ध । मानितील महा-रथी ।
असूनि मान्य तूं ह्यांस । तुच्छता पावशील कीं।।३५।।

बोलतील तुझे शत्रु । भलतें भलतें बहु ।
निंदितील तुझें शौर्य । काय त्याहूनि दुःखद।।३६।।

श्लोक३४— मनुष्यजातीच्या बाह्य जीवनांत गीता पक्की व्यवहारी आहे. आपल्या अभिरूचीला अनुसरणारे ध्येयवादी भंपक आचरण गीतेला मुळीच मान्य नाही. आजच्या काळांत भारतीय बुद्धि पराकाष्ठेची भ्रष्ट झाली आहे. यामुळें कर्माची बाह्य स्थूल कसोटी अगदीच अल्प उपयोगी आहे. स्थितप्रज्ञाची अचूक निर्णयकारी समत्वबुद्धि ही च वास्तविक आणि मुख्य कसोटी आहे. २.४८, ४९,५०,५१. श्लोक ३५चें स्पष्टीकरण असे कीं, अंतरांत देहासक्ति दडली असेल तर एखाद्यानें ब्रह्मचर्याचें व्रत घेतलें आणि त्याचें कितीहि समर्थन केले तरी लोक म्हणणार, हा पाखंडी आहे म्हणून ब्रह्मचारी राहिला. अर्जुन स्वजनासक्तीला कारूण्याचें नांव देत होता ही त्याची आत्मवंचना होती कारण त्यांत देहासक्ति दडली होती. श्लोक ३६— स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः अनेकविध व्यक्तींचे त्यांच्या त्या त्या प्रकृतीला अनुसरून अनेकविध स्वधर्म संभवूं शकतात. असा हा स्वधर्म निंदित होणे, याहून अधिक दुःखद कांहींच असूं शकत नाहीं.

हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्षसे महीम्।
तस्मात् उत्तिष्ठ कौंतेय युद्धाय कृतनिश्चयः।।३७।।

मेल्यानें भोगिसी स्वर्ग । जिंकिल्यानें मही-तळ ।
म्हणूनि अर्जुना ऊठ । युद्धास दृढ-निश्चयें।।३७।।

यज्ञयागादिकांनीं स्वर्गकामना करणारांचा पुढें स्पष्ट निषेध केलेला असतांना २.४३,४४ कामात्मानः स्वर्गपरा.......भोगैश्वर्यप्रसक्तानां.... ९.२०,२१ त्रैविद्या मां सोमपाः.....ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं... असे असता येथें स्वर्गाचें प्रलोभन कसें दाखविलें? समजावयास पाहिजे कीं, हा स्वर्ग वेगळा आहे. कारण तो सकाम कर्मानें लाभलेला नाहीं. धर्म-कार्यांत झालेल्या अंतीम बलिदानांत सहजच फलत्त्याग अपेक्षित आहे श्लोक३८सुखदुःखे समे कृत्वा म्हणून ''योगयुक्त परिव्राट्'' सूर्यमंडळ भेद करून ज्या विशिष्ट स्वर्गगतीला प्राप्त होतो ती गति अशा निरपेक्ष बलिदानानें लाभत असते. त्या अवस्थेंत ब्रह्मविद्या-अधिकार असल्यामुळें मुक्तीची ती एक पायरी होऊं शकते. ब्रह्मसूत्र १; ३. २६-३३.

सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ ।
ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि ।।३८।।

हानि लाभ सुखें दुःखें । हार जीत करीं सम ।
मग युद्धास हो सिद्ध । न लागे पाप तें तुज।।३८।।

एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु ।
बुद्ध्या युक्तो यया पार्थ कर्मबंधंप्रहास्यसि ।।३९।।

सांख्यामधील ही बुद्धि । तीच योगांतहि ऐक तूं ।
तोडशील जिनें सारी । कर्माची बंधनें जगीं ।।३९।।

अहो बत महत्पापं कर्तु व्यवसिता वयम् । यत् राज्यसुखलोभेन हन्तुं स्वजनमुद्यताः ।। १.४५।। ह्यांत तीन विचारदोष आहेत.

१ मी मारणारा, मी त्याग करणारा, मी कर्म करणारा—
आत्म्याविषयीं अज्ञान.

२ स्वजनमोह,कुठल्याहि वस्तुविषयीं अथवा व्यक्तिविषयीं मोह
स्वधर्मनिष्ठेची उणीव.

३ सुखासाठीं राज्य, सुखासाठीं जीवन, सुखासाठीं, स्थैर्यासाठीं
जीवनभर धडपड————कर्मयोगाविषयीं चुकीची कल्पना.

यांच्या निरसनासाठीं—

१ सांख्यबुद्धि २. ११ते३०
२ स्वधर्मनिष्ठा २. ३१ते३८
३ योगबुद्धि २. ३९ते५३

नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते ।
स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ।। ४०।।

न बुडे येथ आरंभ । न येतें विघ्न तें तसें ।
जोडा स्वल्पहि हा धर्म। तारी मोठ्या भयांतुनी।।४०।।

इह अभिक्रम नाशः न अस्ति । म्हणजे न बुडे येथ आरंभ । अर्थ असा कीं, निष्काम कर्मयोगाचा कोणताहि प्रयास कधीहि व्यर्थ जात नाही. स्वल्पमप्यस्य धर्मस्य— निष्काम कर्मयोगांत कर्माच्या बाह्य आकाराला महत्व नाहीं, आंतील निष्कामवृत्तीला महत्व आहें. बाह्यकर्म

केवळ संकेतमात्र आहें. कर्माचा आकार शक्तीवर अवलंबून राहील, लाभणारी चित्तशुद्धि भक्तीचें फळ असेल. हेंच तत्त्व ९.२६ मध्यें भक्तीच्या भाषेंत मांडलें आहे. पत्रंपुष्पंफलंतोयं योऽमे भक्त्या प्रयच्छति। त्रायते महतो भयात्—योग-बुद्धीच्या अभावी एका बाजूनें निष्क्रियता आणि दुसऱ्या बाजूनें कर्मासक्ति, अशी दोन्ही बाजूंनीं आपत्ति उद्‌भवते. फलत्यागयुक्त कर्म-पथावर स्थिर करून योग-बुद्धि या बिकट संकटांतून सोडवते.

व्यवसायात्मिका बुद्धिः एकेह कुरूनंदन ।
बहुशाखाः अनन्ताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम्।।४१।।

ह्यांत निश्चय तो एक बुद्धि एकाग्र ती तशी ।
निश्चयाविण बुद्धीचे फाटे ते संपती चि ना।।४१।।

यामिमां पुष्पितां वाचं प्रवदन्ति अविपश्चितः ।
वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः ।।४२।।

अविवेकी वृथा वाणी बोलती फुलवूनियां ।
वेदाचे घालिती वाद म्हणती दुसरें नसे ।।४२।।

कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम् ।
क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ।।४३।।

जन्मूनियां करा कर्मे मिळवा भोग-वैभव ।
भोगा कर्म-फळें गोड सांगती स्वर्ग-कामुक।।४३।।

ऐहिक तसेच पारलौकिक भोग-वैभव मिळवा.

भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम् ।
व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते।।४४।।

त्यामुळें भुलली बुद्धि गुंतली भोग-वैभवीं ।
ती निश्चय न लाभूनि समाधींत नव्हे स्थिर।।४४।।

समाधी म्हणजे निष्काम कर्मयोगांतील एकाग्रतेचा परिणाम, समत्व.

त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन ।
निर्द्वन्द्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान्।।४५।।

तिन्ही गुण वदे वेद त्यांत राहें अलिप्त तूं ।
सत्त्व सोडूं नको सोशीं द्वंद्वें निश्चिंत सावध।।४५।।

यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके ।
तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ।।४६।।

सर्वत्र भरलें पाणी तेव्हां आडांत अर्थ जो ।
विज्ञानी ब्रह्म-वेत्त्यास सर्व वेदांत अर्थ तो।।४६।।

(अ) अनुभवी पुरूषाच्या ज्ञानांत वेदांचा अंतर्भाव होतो.
(आ) अनुभवी पुरूषाला वेदांचे आपल्या गरजेपुरतें च प्रयोजन.
(इ) अनुभवी पुरूषाला वेदांचे प्रयोजन च उरत नाहीं.
— असा तिहेरी अर्थ या श्लोकांतील उपमेनें सूचित होतो.

कर्मणि एव ते अधिकारः फलेषु मा कदाचन ।
कर्मफलहेतुः मा भूः अकर्मणि ते संङ्गः मा अस्तु।।

कर्मांत चि तुझा भाग तो फळांत नसो कधीं ।
नको कर्म-फळीं हेतु अकर्मीं वासना नको ।।४७।।

(१) 'कर्मणि एव ते अधिकारः' (असो) म्हणजे कर्मापुरता च तूं आपला अधिकार समज, फलाविषयीं समजूं नको. ज्याचा कर्मा-विषयीं अधिकार आहे त्याचा फलाविषयीं हि आहे. परंतु तो तूं सोडून दे आणि कर्मापुरता च अधिकार राख, अशी येथें विशिष्ठ शिकवण आहे. देहधारी अवस्थेंत आत्म्याचें अकर्तृत्व अनुभवण्याची ही युक्ति आहे. (१८.११)
(२) 'अकर्मणि ते संगः मा अस्तु'— साधकानें निष्ठापूर्वक नियत कर्मयोग आचरावा. मी कर्मरहित केव्हां होईन, कर्मबंधनांतून माझी सुटका केव्हां होईल, मला मोक्ष केव्हां लाभेल, अशीहि वासना त्यानें राखूं नये. ज्ञानविषयक योगक्षेमाचीहि चिंता त्यानें करूं नये. कर्मयोग-युक्ताला, अनन्य-भक्ताला, यथाकाळीं ज्ञान लाभतच असतें. (४.३८; ९.२२; १०.१०,११)

(३) अकर्म हें आत्म्याचें स्वरूपच आहें. निष्काम कर्म करीत राहिल्यानें तें सहज च अनुभवास येतें. त्याच्या हि वासनेनें तें दुरावतें.

योगस्थः कुरू कर्माणि सङ्गं त्यक्त्वा धनंजय ।
सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते।।

फळ लाभो न लाभो तूं नि:संग सम होउनी ।
योग-युक्त करीं कर्मे योग-सार समत्व चि ।।४८।।

'योग' शब्दाची सारभूत व्याख्या गीतेनें स्वतः च दिली असल्यामुळें गीतेच्या प्रयोजनाविषयीं संदेहाला जागा राहत नाही. (५.१९) विवरणासाठीं ६.३२ टीप.

दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगात् धनंजय ।
बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः ।।४९।।

समत्व-बुद्धि ही थोर कर्म तीहूनि हीन चि ।
बुद्धीचा आसरा घे तूं मागती फळ दीन ते।।४९।।

(१) कृपण— दीन, काम-हत, कींव करण्यास योग्य.

(२) कर्माहून बुद्धि थोर, आणि फळाहून कर्म थोर, अशीं दोन प्रमेयें या श्लोकांत एकत्र मांडली आहेत. दुसऱ्या प्रमेयानुसार फळ सोडून कर्म करावे म्हणता, तर पहिल्या प्रमेयानुसार कर्म सोडून बुद्धीचा आश्रय कां घेउं नये, असा अर्जुनानें तिसऱ्या अध्यायाच्या आरंभीं सरळ च प्रश्न विचारला आहे.

बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते ।
तस्मात् योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम्।।५०

येथें समत्व-बुद्धीनें टळे सुकृत-दुष्कृत ।
समत्व जोड ह्यासाठीं तें चि कर्मांत कौशल।।५०।।

'कौशलम्'—कुशलता, खुबी, सुरक्षितता. समत्व ही च कर्मांतील सुरक्षितता आहे. कारण त्या योगें कर्म करून हि सुकृत-दुष्कृत टळतें. म्हणून च ती खुबी हि आहे. शिवाय समत्व हा व्यावहारिक अर्थानें हि कुशल गुण असल्यामुळें त्यांतून बाह्य कर्म-कुशलतेची अपेक्षा करणें हि चुकीचें नाहीं.

कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः ।
जन्मबन्धविनिर्मुक्ताः पदं गच्छन्ति अनामयम्।।५१।।

ज्ञानी समत्व-बुद्धीनें कर्माचें फळ सोडुनी ।
जन्माचे तोडिती बंध पावती पद अच्युत।।५१।।

चरण १ —ज्ञानी + समत्व-बुद्धि
चरण २ —फलत्याग
चरण ३ —जीवन्मुक्ति (स्थितप्रज्ञता)
चरण ४ —विदेहमुक्ति (ब्रह्मनिर्वाण)
— असा हा एकश्लोकी द्वितीयाध्याय आहे.

यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति ।
तदा गन्तासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ।।५२।।

लंघूनि बुद्धि जाईल जेव्हां हा मोह-कर्दम ।
आलें येईल जें कानीं तेव्हां जिरविशील तूं ।।५२।।

श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला ।
समाधौ अचला बुद्धिः तदा योगं अवाप्स्यसि।।५३।।

श्रवणें भ्रमली बुद्धि तुझी लाभूनि निश्चय ।
स्थिरावेल समाधींत तेव्हां भेटेल योग तो ।।५३।।

## अर्जुन उवाच

स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव ।
स्थितधीः किं प्रभाषेत किं आसीत व्रजेत किम्।।५४।।

स्थिरावला समाधींत स्थित-प्रज्ञ कसा असे ।
कृष्णा सांग कसा बोले कसा राहे फिरे कसा।।५४।।

गीतेचा पूर्ण आदर्श गीतेनें स्थित-प्रज्ञ या विशिष्ट शब्दानें मांडला आहे. 'स्थितधीः किमासीत' 'स्थित-प्रज्ञ कसा असे' यांत चार प्रश्न आहेत—

१ स्थित-प्रज्ञाची परिपूर्ण व्याख्या कशी होईल?
२ त्याचें सर्वांना समजण्यासारखें लक्षण काय होईल?
३ कोणत्या साधनेनें आणि उपपत्तीनें तें लक्षण साधकाला आपल्या . ठिकाणीं बिंबवून घेतां येईल?
४ स्थित-प्रज्ञाच्या जीवन-यात्रेचें किंवा विहाराचें स्वरूप कसें राहील?

या प्रश्नांचीं उत्तरें यथाक्रम—
१ श्लोक ५५.
२ श्लोक ५६ ते ५८.
३ श्लोक ५९ ते ६१ आणि ६२ ते ६८.
४ श्लोक ६९ ते ७१— यांत दिली आहेत.

स्थित-प्रज्ञ-लक्षणें हें गीतेंतील अत्यंत महत्वाचें प्रकरण आहें.
शेंवटचा ७२वा श्लोक अंतिम फलित दर्शविणारा आहे.

## श्री भगवान् उवाच

प्रजहाति यदा कामान् सर्वान् पार्थ मनोगतान् ।
आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते।।५५।।

कामना अंतरांतील सर्व सोडूनि जो स्वयें ।
आत्म्यांत चि असे तुष्ट तो स्थित-प्रज्ञ बोलिला।।५५।।

कामनात्यागानें चित्त आत्म्यांत रमतें. मग तिथें त्याला अक्षय-सुखाचा ठेवा लाभून तें त्यांत विरघळून जातें. (५.२१)

दुःखेषु अनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।
वीतरागभयक्रोधः स्थितधीः मुनिः उच्यते ।।५६।।

नसे दुःखांत उद्वेग सुखाची लालसा नसे ।
नसे तृष्णा भय क्रोध तो स्थित-प्रज्ञ संयमी ।।५६।।

सुलभ साधन— वृत्तिसारूप्य नको.

यः सर्वत्र अनभिस्नेहः तत्तत् प्राप्य शुभाशुभम् ।
न अभिनन्दति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता।।५७।।

सर्वत्र जो अनासक्त बरें वाईट लाभतां ।
न उल्लासे न संतापे त्याची प्रज्ञा स्थिरावली।।५७।।

सुलभतर साधन— ओघवाह्यता नसावी. (भक्त-लक्षण १२.१७)‘यः सर्वत्र अनभिस्नेहः’ आसक्तीचे सर्वच प्रकार वर्ज्य आहेत. ते चार विभागांत वाटता येतात.

१ स्वजनासक्ति १.३७
२ देहासक्ति २.१३
३ कर्म-फलासक्ति २.४७
४ अकर्मासक्ति २.४७

यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वशः ।
इन्द्रियाणि इंन्द्रियार्थेभ्यः तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता।। ५८।।

घेई ओढूनि संपूर्ण विषयांतूनि इंद्रियें ।
जसा कासव तो अंगें तेव्हां प्रज्ञा स्थिरावली।। ५८।।

सुलभतम साधन— इंन्द्रियनियमन.

विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिनः ।
रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्वा निवर्तते ।। ५९।।

निराहार-बळें बाह्य सोडी विषय साधक।
आंतील न सुटे गोडी ती जळे आत्म-दर्शनें ।। ५९ ।।
निराहाराचें सामर्थ्य गीतेला मान्य आहे. साधकाच्या साधनेंतील निराहार हें एक नि:संशय महत्वाचें अंग आहे. पण त्याच्या शक्तीला मर्यादा आहे एवढेंच सुचवायचें आहे.

यततो ह्यपि कौन्तेय पुरूषस्य विपश्चित ।
इन्द्रियानि प्रमाथीनि हरन्ति प्रसभं मन: ।। ६० ।।

करीत असतां यत्न ज्ञात्याच्याहि मनास हीं ।
नेती खेंचून वेगानें इंद्रियें दांडगीचि कीं ।। ६० ।।

यत्नवान् ज्ञात्याच्या मनाला जेव्हां इन्द्रियें खेंचून नेतात तेव्हां तो हार खात नाही. विवके आणि धैर्य या दोन्ही शक्ति अपुऱ्या पडत आहेत असें पाहून तो तिसऱ्या शक्तीचें, भगवदाश्रयाचें आवाहन करतो. ( पुढील श्लोक)

तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्पर:।
वशे हि यस्येन्द्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ।। ६१ ।।

त्यांस रोधूनि युक्तीनें रहावें मत्परायण ।
इंद्रियें जिंकिलीं ज्यानें त्याची प्रज्ञा स्थिरावली ।। ६१ ।।

योग-युक्तीनें इंद्रियनिग्रह कसेंहि करून साधलाच पहिजे. तेवढ्यानें आंतली गोडी सुटेलच असें नाहीं. त्यासाठीं ‘युक्त आसीत

मत्परः' म्हणजे आत्मदर्शन होऊन गोडीहि नाहींशी होईल. इंद्रिय निग्रहाची एक सर्वसामान्य युक्ति ६.१६,१७ मध्यें दर्शविली आहे.

ध्यायतो विषयान्पुंसः संगस्तेषूपजायते ।
संगात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ।। ६२।।

विषयांचें करी ध्यान त्यास तो संग लागला ।
संगातूनि फुटे काम क्रोध कामांत ठेविला ।। ६२।।

क्रोध म्हणजे कामांतून उत्पन्न होणारी चित्ताची अप्रसन्नता अथवा क्षोभ. कामांतून क्रोध म्हणजेच क्षोभ अवश्यंभावी आहे.

क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः ।
स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ।। ६३।।

क्रोधांतूनि जडे मोह मोहानें स्मृति लोपली ।
स्मृतिलोपें बुद्धि-नाश म्हणजे आत्म-नाशचि ।। ६३।।

१—स्मृति म्हणजे आत्मस्मृति, मी कोण याचें भान (१८.७३)

२—बुद्धि-नाश म्हणजे बुद्धीची आत्माभिमुखता नाहिशी होणें. अशी बुद्धि स्वाभाविकच निर्णयकारी राहत नाही. उळमळीत, संदेहानें भरलेली, संशयाकुल राहते. बुद्धि संशयाकुल झाली म्हणजे कोणताहि पुरूषार्थ साधण्याला मनुष्य असमर्थ बनतो. हाच आत्म-नाश म्हणावयाचा. संशयात्मा विनश्यति। असें म्हटलेच आहे. (४.४०) या उलट स्थिति (१८.७३) मध्यें दर्शविली आहे.

३—आत्म-नाश म्हणून वेगळी पायरी नाही. बुद्धि-नाश झाला म्हणजे तोच आत्म-नाश समजावयाचा. वस्तुत: आत्म्याचा नाश होत नाही. पण बुद्धीच्या गुणाला अनुसरून आत्म्याविषयीं भाषा बोलली जाते असा एतद्विषयक एक न्याय ब्रह्म-सूत्रांत मांडला आहे. (ब्रह्मसूत्र २,३,२९.)

रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिन्द्रियैश्चरन् ।
आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ।। ६४।।

राग-द्वेष परी जातां आली हातांत इंद्रियें ।
स्वामित्वें विषयीं वर्ते त्यास लाभे प्रसन्नता ।। ६४।।

प्रसन्नता— चित्ताची निर्मलता, निर्विकारता.( निष्कामता-परिणाम )

प्रसादे सर्वदु:खानां हानिरस्योपजायते ।
प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धि: पर्यवतिष्ठते ।। ६५।।

प्रसन्नतेपुढें सर्व दु:खें जाती झडूनियां ।
प्रसन्नतेनें बुद्धीची स्थिरता शीघ्र होतसे ।। ६५।।

साधकाने चित्ताची प्रसन्नता प्राप्त करून घेण्याकडे सर्व शक्ति लावावी. मग बुद्धीच्या स्थिरतेसाठीं वेगळें कांहीं करावें लागत नाहीं.

नास्ति बुद्धिरयुक्तस्य न चायुक्तस्य भावना ।
न चाभावयतः शान्तिरशान्तस्य कुतः सुखम् ।। ६६।।

अयुक्तास नसे बुद्धि त्यामुळें भावना नसे ।
म्हणूनि न मिळें शांति शांतीविण कसें सुख ।।६६।।

(१) अयुक्त— योग-युक्ति-विहीन; असंयमी, अजितेंद्रिय.
(२) बुद्धि— स्थिरबुद्धि ( निर्णयक्षम )
(३) भावना— बुद्धीची मुरलेली अवस्था ( पारिभाषिक शब्द )
(४) शांति—अक्षोभ,विकारोपशम,चित्त-समाधान (प्राथमिक स्वरूप) शांतीचें अंतीम स्वरूप श्लोक ७१.
(५) सुख— आत्मसुख.
(६) युक्ति, बुद्धि, भावना, शांति आणि आत्मसुख हीं व्यक्तीच्या आणि समाजाच्या जीवनांतील पाच सर्वोत्तम मूल्यें या श्लोकांत कार्य-कारण-भावानें गुंफलीं आहेत.

इन्द्रियाणां हि चरतां यन्मनोऽनु विधीयते ।
तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवाम्भसि ।। ६७।।

इंद्रियें वर्ततां स्वैर त्यांमागें मन जाय जें ।
त्यानें प्रज्ञा जशी नौका वाऱ्यानें खेंचली जळीं ।।६७।।

स्थितप्रज्ञ-लक्षणांत प्रज्ञा शब्द सामान्य बुद्धीहून अधिक अर्थाचा आहे. आत्माभिमुखबुद्धि असा त्याचा अर्थ सांगतां येईल. ही आत्माभिमुखबुद्धि देखील संयम ढिला झाल्यास विषयाकडे खेंचली जाऊं शकते असें सूचन श्लोक ६७ मध्यें आहे.

तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः ।
इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ।। ६८।।

म्हणूनि इंद्रियें ज्यानें विषयांतूनि सर्वथा ।
ओढूनि घेतलीं आंत त्याची प्रज्ञा स्थिरावली ।। ६८।।
श्लोक ५८ मधील प्रतिज्ञेचें निगमन.

या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ।
यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ।। ६९।।

सर्व भूतांस जी रात्र जागतो संयमी तिथें ।
सर्व भूतें जिथें जागीं ज्ञानी योग्यास रात्र ती ।। ६९।।

योगबुद्धि ज्याच्याठायीं मुरली आहे त्या स्थितप्रज्ञाच्या दृष्टीनें सारीच जीवनमूल्यें पालटतात असा या श्लोकाचा भावार्थ आहे.

आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं
समुद्रमापः प्रविशन्ति यद्वत् ।
तद्वत्कामा यं प्रविशन्ति सर्वे
स शान्तिमाप्नोति न कामकामी ।। ७० ।।

न भंग पावे भरतांहि नित्य
समुद्र घेतो जिरवूनि पाणी ।
जाती तसे ज्यांत जिरूनि भोग
तो पावला शांति न भोग-लुब्ध ।। ७० ।।
जिरवणें म्हणजे आत्मसात करणें, आपलें रूप देणें. इंद्रियद्वारा प्रवेश करणाऱ्या विषयांना आत्म्याचें रूप देणें ही एक अद्भूत

कला आहे. ती ज्याला साधली त्याला अशांतीचें कारणच राहत नाही.

विहाय कामान्यः सर्वान्पुमांश्चरति निःस्पृहः ।
निर्ममो निरहंकारः स शान्तिमधिगच्छति ।। ७१ ।।

सोडूनि कामना सर्व फिरे होऊनि निःस्पृह ।
अहंता ममता गेली झाला तो शांति-रूपचि ।। ७१ ।।

(१) फिरे— स्थितप्रज्ञाचा जीवनविहार—
(अ) विश्वोद्धारासाठीं,
(आ) प्रारब्ध शेष म्हणून,
(इ) मुक्त मनानें.

(२) निःस्पृह म्हणजे निरिच्छ, जीवनासक्ति नसलेला. कामना सुटली तरी जीवनासक्ति उरूं शकते तीहि नसलेला.

(३) शांति म्हणजे परम समाधान—मोक्षाची पूर्व कल्पना, 'निर्ममो निरहंकारः' हेंच तिचें स्वरूप.

एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति ।
स्थित्वास्यामन्तकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति ।। ७२ ।।

अर्जुना स्थिति ही ब्राह्मी पावतां न चळे पुन्हां ।
टिकूनि अंत-काळींहि ब्रह्म-निर्वाण मेळवी ।। ७२ ।।

(१) एकदा ब्राह्मी स्थिति लाभली म्हणजे मनुष्य तिच्यांतून चळत नाहीं, अंतकाळींहि त्याच अवस्थेंत टिकून राहतो आणि म्हणून मोक्ष मिळवितो. अंतकालीन साधनेची गरज जी सामान्य साधकास राहते (अध्याय ८) ती ब्राह्मी स्थिति लाभल्यानंतर राहत नाही.

(२) ‘ नैनां प्राप्य विमुह्यति ’ इतके म्हटल्यानंतर ‘ स्थित्वास्यां अंतकालेऽपि ’ हें पुनरूक्तच. हे ब्राह्मण-परिव्राजक-न्यायानें आणि प्रयत्न-सातत्य-सूचनार्थ समजावे.

(३) ब्राह्मी स्थिति—जेथून पडणें नाहीं.
ब्रह्म-निर्वाण—जेथून चढणेंहि नाहीं. ( गीतेचा पारिभाषिक शब्द )

# {१४}

# अध्याय तिसरा

## अर्जुन उवाच

ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिः जनार्दन ।
तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव ।। १ ।।

बुद्धि कर्माहुनी थोर मानिसी तूं जनार्दना ।
मग कर्मांत कां घोर घालिसी मज केशवा ।। १ ।।

दुसऱ्या अध्यायांत जीवनाचें समग्र दर्शन विवरून झालें. त्यांत कर्माची आवश्यकता मानली असली तरी त्याचें गौणत्व चुकत नाहीं. (२.४९) म्हणून अर्जुनाचा हा प्रश्न आहे. त्याचें थोडक्यांत उत्तर तिसऱ्या अध्यायांतील पहिल्या अधिकरणांत ( श्लोक ३ ते ८ ) दिलें आहें. तेंच पुढें श्लोक ९ ते ३५ पर्यन्त विवरलें आहे.

व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे ।
तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम् ।। २।।

मिश्र बोलूनि बुद्धीस जणूं मोहांत टाकिसी ।
ज्यानें मी श्रेय पावेन सांग तें एक निश्चित ।। २।।

१—अर्जुनाची नि:संकोच वृत्ति
२—नम्रता
३—तत्त्व-जिज्ञासा
४—निर्णयानुसार वागण्याचा निश्चय
श्लोकांतील एकेका चरणांत पाहण्यासारखी आहेत.

श्री भगवान् उवाच

लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा पुर ाप्रोक्ता मयानघ ।
ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम् ।। ३।।

दुहेरी या जगीं निष्ठा पूर्वी मी बोलिलों असें ।
ज्ञानानें सांख्य जी पावे योगी कर्म करूनियां।। ३।।

निष्ठा—शेंवटची अवस्था. परिपूर्ण निश्च ठेचें स्वरूप एकच. पण ती दोन प्रकारांनीयात्मक स्थिति.
(१) निष लाभत असते. सांख्यांची तत्त्वज्ञानानें, तर योग्यांची प्रयोगपूर्वक अर्थात् कर्मयोगानें.

(२) गीतेचा प्रवक्ता श्रीकृष्ण ऐतिहासिक व्यक्ति कल्पिला असला तरी व्यक्तिगत अहंकार लोपलेला वामदेववत् वैदिक विश्वात्मभावाच्या भूमिकेवरून बोलणारा, पुरूषोत्तम आहे. त्याचें भाषण ईश्वरच जणूं मानवरूपांत बोलत आहे अशा स्वरूपाचें आहे. म्हणून त्याच्या तोंडचा 'मी' हा शब्द ईश्वरवाचक समजला पाहिजे. तथापि अर्जुनाला समजावित असल्याचें भानहि कायम असल्यामुळें मधून-मधून 'मी' शब्द व्यक्तिवाचकहि येतो. हे दोन्ही 'मी' वक्त्याच्या आन्तर अनुभवानें एकाच अर्थाचे असल्यामुळें इतके सळमिसळ झाले आहेत कीं एका वाक्यांत व्यक्ति-गत 'मी' आणि दुसऱ्या वाक्यांत विराट् 'मी' असें दिसून येते.

न कर्मणां अनारंभात् नैष्कर्म्यं पुरूषोऽश्नुते ।
न च संन्यसनात् एव सिद्धिं समधिगच्छति ।। ४ ।।

न कर्मारंभ टाळूनि लाभे नैष्कर्म्य तें कधीं।
संन्यासाच्या क्रियेनें चि कोणी सिद्धि न मेळवी।।४।
कर्माच्या संन्यासानें सिद्धि मिळूं शकते १८.४९ पण तें आत्मज्ञानाचें कार्य आहे. ज्ञानाभावी संन्यासाचें च कर्म होऊन बसते.

न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ।
कार्यते हि अवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ।। ५।।

कर्माविण कधीं कोणी न राहे क्षण-मात्र हि ।
प्रकृतीच्या गुणीं सारे बांधिले करितात चि ।। ५ ।।

सारांश, कर्म करण्यांत मोठासा गुण नाही पण कर्म न करण्यांत मोठा च दोष आहे. निष्काम कर्म हा यावर गीतेचा तोडगा आहे. त्यानें न करण्याचा दोष टळून करण्यांत गुण दाखल होतो.

कर्मेन्द्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् ।
इन्द्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते ।। ६ ।।

इंन्द्रियें करिती कर्म मूढ त्यांस चि रोधुनी ।
राहतो भोग चिंतूनि तो मिथ्याचार बोलिला ।। ६ ।।

१—मूळ संकृतांत कर्मेन्द्रिय असा शब्द पडला असला तरी हा पारिभाषिक पांच कर्मेन्द्रियांचा उल्लेख नाही. दाही इंद्रियें कर्म करणारी च आहेत. ज्ञानेंद्रियें, कर्मेन्द्रियें हा त्यांतल्या त्यांत भेद अपेक्षाकृत आहे. ही दाही कर्म करतात हा त्यांचा दोष नसून गुण आहे. तो गुण ईश्वराच्या भक्तींत म्हणजे च निष्काम कर्मयोगांत, राबवून घेणें ही साधनेची खुबी आहे. श्लोक ७.
२—मिथ्याचार म्हणजे ढोंगी च असें समजण्याचें कारण नाहीं. ढोंगी असेल अथवा ढोंगी नसून हि ज्याचा आचार लटका पडला—म्हणजे व्यर्थ ठरला—असा दिशाभूल झालेला हि असूं शकेल.

यस्त्विन्द्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन ।
कर्मेन्द्रियैः कर्मयोगं असक्तः स विशिष्यते ।। ७।।

जो इंन्द्रियें मनानें तीं नेमुनी त्यांस राबवी ।
कर्म-योगांत निःसंग तो विशेष चि मानिला ।। ७।।

१—साधकाचा सदाचार तीच योगनिष्ठा—अंतस्त्यागी बहिःसंगी. ७
२—या उलट मिथ्याचार—अंतःसंगी बहिःस्त्यागी श्लोक ६.
३—उभयभिन्न सांख्यनिष्ठा—अंतस्त्यागी बहिस्त्यागी.

नियतं कुरू कर्म त्वं कर्म ज्यायो हि अकर्मणा ।
शरीरयात्रापि च ते न प्रसिद्ध्येत् अकर्मणा ।। ८।।

नेमिलें तूं करी कर्म करणें हे चि थोर की ।
तुझी शरीर-यात्रा हि कर्माविण घडे चि ना ।। ८।।

इति लेखनसीमा

आप्पा ठोंबरे.

# कांहीं चिंतनें

श्लोक ४०— निष्काम कर्म का छोटा-सा प्रयास भी व्यर्थ नहीं जाता है । सकाम कर्म का बडे से बडा प्रयास भी व्यर्थ ही जाता है । यह सकाम बुद्धि है, यह सदा असफल होती है; लाभ हो तो भी हानि ही होती है सकाम बुद्धि में । क्योंकि अपेक्षा का कोई अंत नहीं है। जो भी मिलता है, सदा छोटा पडता है। जो भी सफलता मिलती है, वह किसी बडी असफलता के सामने फीकी लगती है । कुछ भी मिल जाय तो भी संतोष की कहीं झलक नहीं आती। सकाम कर्म, असफल होने को बाध्य है । असफलता में नहीं है उसका राज, उसका राज सकाम होने में है।

कृष्ण कहते हैं, 'निष्काम कर्म का छोटा-सा कृत्य भी सफल ही होता है।' होगा ही, क्योंकि असफलता का कोई उपाय नहीं है । जब निष्काम है, तो अपेक्षा रहित है । इसलिए जो भी मिल जाय, वह भी बहुत है, क्योंकि कोई अपेक्षा नहीं थी, जिससे उसको छोटा बताया जा सके । उस अनंत अपेक्षा के पास खींची गयी कोई भी सफलता, सदा छोटी पडती है । लेकिन कृष्ण कह रहे हैं कि अपेक्षा की लकीर मिटा दो । निष्काम कर्म का यही अर्थ है— अपेक्षा रहित, फल की आकांक्षा रहित, कामना रहित कर्म करना ।

अगर अपेक्षा की लकीर मिटा दो, फिर छोटा-सा भी कर्म तृप्ति ही लाता है । कितना ही छोटा हो वह, तो भी बडा ही होता है, क्योंकि तौलने के लिये नीचे लकीर ही नहीं होती । इसलिए निष्कामकर्मी कभी भी विषाद को उपलब्ध नहीं होता है । फ्रस्टेशन, विषाद जो है, वह सकाम कर्म की छाया है । सभी विघ्न, सब बाधाएँ, सब विफलताएँ सकाम मन की निर्मितियाँ हैं । जरा-सा निष्काम भाव, और बडे-बडे भय जीवन के दूर हो जाते है ।

श्लोक ४१— कृष्ण कुछ और बात कह रहे हैं । वे यह नहीं कह रहे हैं कि तुम निश्चय करो । वे यह कह रहे हैं कि जो निष्काम कर्म की यात्रा पर निकलता है, उसको निश्चयात्मक बुद्धि उपलब्ध हो जाती है; क्योंकि उसके पास एक ही मन रह जाता है— जो विषयोंमें भटकता नही, जो अपेक्षा करता नहीं, जो कामना की व्यर्थता को समझ लेता है, जो भविष्य के लिए आतुरता से फल की माँग नहीं करता, जो क्षण में और वर्तमान में जीता है— वैसे व्यक्ति को एक मन उपलब्ध होता है । एक मन निश्चयात्मक हो जाता है । तब उसे निश्चय ‘करना’ नहीं पडता है ।

श्लोक४२,४३,४४— वासनाग्रस्त व्यक्ति निष्काम कर्म की गहराई को समझने में असमर्थ है । जहाँ कर्म से कामना हट जाती है, तब जो शेष रह जाता है, वही

कर्मयोग है । कामना मात्र को शेष कर देना है । इस बात को थोडा गहरे से समझ लेना जरूरी है । कठिन है बहुत, क्योंकि साधारणत: हम सोचेंगे कि फिर कर्म होगा ही कैसे? क्योंकि कर्म का 'मोटिवेशन' कर्म की प्रेरणा कहाँ से उत्पन्न होगी? लेकिन कृष्ण कहते हैं कि ऐसा कर्म हो सकता है, जहाँ कामना नहीं हो । यह वक्तव्य बहुत महत्वपूर्ण है । जो हमारी जिंदगी में परिचित नहीं है, उसे, हमें किसी कें जिंदगी में झाकना पडेगा । हमारी जिंदगी ही इति नही है । पहले तो यही देखना पडे क्या यह संभव है? अगर संभावना दिखाई पडे, तो कल शायद सत्य भी हो सकती है ।

लेकिन महाराज, जिनको आप सुनकर आ रहे हैं, संगीत उनके लिए कुछ पानेका साधन नहीं है । आगे कुछ भी नहीं है, जिसे पानेको वे बजा रहे हैं । बल्कि पीछे कुछ है, जिस पर उनका संगीत फूट रहा है, और बज रहा है । कुछ पा लिया है, कुछ भर गया है अब वह बह रहा है । कोई अनुभूति, कोई सत्य, कोई परमात्मा प्राणों में भर गया है । अब वह बह रहा है—'ओव्हर फ्लो' हो रहा है । स्वभावत: हम भी पूछते है, किसलिए, किसलिए? पर तानसेन नें कहा, ' नदियाँ किसलिए बह रही है? फूल किसलिए खिल रहा है? सूर्य किसलिए निकल रहा है? 'किसलिए' —मनुष्य की बुद्धि ने पैदा किया है ।

सारा जगत् एक 'ओव्हर फ्लोइंग' है— आदमी को छोडकर । सारा जगत् आगे के लिए नहीं जी रहा है, सारा जगत् भीतर से जी रहा है । फूल खिल रहा है; खिलने में ही आनंद है । सूर्य निकल रहा है, निकलने में ही आनंद है । हवाएँ बह रही है, बहने में ही आनंद है । आकाश है, होने में ही आनंद है । आनंद कहीं से आता नहीं, वह अभी है, यहीं है । और जो हो रहा है, वह भीतर की उर्जा का अकारण बहाव है । वह 'अन्मोटिवेटेड ऐक्ट' है— जिस पर कि कृष्ण का सारा कर्मयोग खडा होगा । वह जीवन को भविष्य की तरफ से पकडना नहीं, वह जीवन को आकांक्षा की तरफ से खींचना नहीं, वरन् व्यक्ति के भीतर छिपा हुआ जो अव्यक्त है, उसकी 'ओव्हर फ्लोइंग', उसका उपर से बह जाना है । कृत्य, उस दिन निष्काम है । प्रार्थना जब 'अन्मोटिवटेड' है; किसी को पाने के लिए नही वरन्, भीतर के भाव से जन्मी और अपने में पूरी है, आगे कुछ द्वार नहीं खोज रही है— तो प्रार्थना है । उसी क्षण में प्रार्थना सफल है, जिस क्षण प्रार्थना निष्काम है । प्रत्येक कर्म प्रार्थना बन जाता है, अगर निष्काम बन जाय । हम पुण्य भी करते हैं, तो कुछ पाने को करते है । और कृष्ण कह रहे हैं कि पाने के लिए करना ही अधर्म है। पाने की आकांक्षा के बिना ही जो कृत्य का फूल खिलता है— 'दी फ्लॉवरिंग ऑफ् प्युअर ॲक्ट', शुद्ध

कर्म जब खिलता है, बिना किसी कारण के, तभी वह धर्म-कृत्य हुआ । अगर कर्तव्य में जरा-सी भी अकांक्षा है, तो कर्तव्य पाप हो गया । यह हमे कठिन पडेगा, क्योंकि हमारी जिंदगी में ऐसा कोई भी कर्म नहीं है, जिससे हमारी पहचान हो, जिससे हम समझ पायें । सिर्फ देखते रहे; छाता उठाकर दें और रास्ते पर चल पडे और भीतर देखते रहे कि कोई माँग तो नहीं उठती— धन्यवाद की भी । उठेगी; लेकिन् दो-चार कृत्यों में देखते रहे और अचानक पायेंगे कि क्या पागलपन है ! दिन में जो आदमी एक कृत्य भी 'अन्मोटिवेटेड' कर ले, वही कृष्ण की गीता को समझ पा सकता है । एक कृत्य भी, घण्टे में, कर ले, जिसमें कि कुछ माँग न हो, चेतन अचेतन कोई माँग न हो — किया और हट गये और चल गये— तो कृष्ण की गीता को, कृष्ण के कर्मयोग को समझने का मार्ग खुल जाएगा । यह कृष्ण अर्जुन से जो कह रहे है, वह पूरी की पूरी प्रयोगात्मक बात है । कर्मयोग का सार है : कामना शून्य कर्म; काम से कामना गयी । हमने तो 'काम' ही शब्द रखा हुआ है, कर्म के लिए । क्योंकि काम कामना से ही बनता है । हम तो कहते है काम वही है, जो कामना से निकलता है । लेकिन कृष्ण कहते हैं, काम से अगर कामना घट जाय तो वह कर्म-योग हो जाता है।

तो फिर वह साधारण कर्म नहीं रह जाता है; वह योग बन जाता है । तो न पाप है, न पुण्य है, न बंधन है, न मुक्ति है— तब द्वंद्व के बाहर है व्यक्ति ।